# नवभारत



किंमत १ रुपया
जून १९४८

अनुक्रमणिका











नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्त मंडळाचें मासिक

# नवभारत

वर्ष पहिलें, अंक नववा जून १९४८

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर | आचार्य स. ज. भागवत

श्री. हरि कृष्ण मोहनी | प्रो. वि. म. बेडेकर (कार्य. संपादक)

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल, अशा प्रकारें महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणें, हें या मासिकाचें ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनीं स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठीं जें आपलें सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेलें असेल, उच्च वातावरणांतील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेनें संगृहीत केलेला असेल, त्याचें दिग्दर्शन हेंच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊं शकतें, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकांत येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतु नाहीं.

संचालक व संपादक-मंडळांतील सर्व व्यक्ती यांचेंही सर्व विषयांत मतैक्य आहे, असें नाहीं. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधीं सदृश अशा दृष्टिकोनानेंच त्यांना एकत्र आणलें आहे. तथापि प्रत्येकाचें व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होतां विकास व्हावा या दृष्टीनेंच त्यांचें सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ति आपल्या नांवानें प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकांत प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणांत सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

मुद्रक व प्रकाशक र. ग. जोशी यांनीं हें मासिक विश्वास छापखाना, २९१ शनिवार, पुणें २, येथें छापिलें आणि नवभारत कचेरी, २१९ शिवाजीनगर, पुणें ५ येथें सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां प्रसिद्ध केलें.

अनुक्रमणिका

# नवभारत, जून १९४८

## या अंकांतील लेखक

**महामहोपाध्याय प्रा. वा. वि. मिराशी** ( उमरावती )--विदर्भ महाविद्यालयाच प्राचार्य. प्राच्यविद्यापंडित, पुराणेतिहाससंशोधक, ' कालिदास ' आदि ग्रंथांचे कर्ते.

**श्री. केदारनाथ** ( मुंबई )—एक ' सर्वोदय 'निष्ठ तत्त्वचिंतक आणि कार्यकर्ते. गांधीजींचे सहकारी. या अंकांतील त्यांचा लेख हा श्री. किशोरलाल मश्रूवाला यांच्या ' संसार व धर्म ' या आगामी पुस्तकामधील 'पूर्तिप्रकरणां'तलि एक प्रकरण आहे.

**श्री. दि. के. बेडेकर** ( पुणें )—'सोव्हिएट राष्ट्रें व लोक, ' 'संयुक्त महाराष्ट्र' ' सुमित्रा-नंदन पंत ' या पुस्तकांचे कर्ते.

**प्रा. के. रा. कानिटकर** एम्. ए. बी. एस्सी. ( पुणें ) — फर्ग्युसन कॉलेजचे आणि अमळनेर येथलि प्रताप कॉलेजचे माजी प्राचार्य. मुंबई विश्वविद्यालयाच्या सिंडिकेटचे माजी सदस्य. शिक्षणक्षेत्रांतील एक प्रसिद्ध तज्ज्ञ व कार्यकर्ते.

**श्री. वि. स. खांडेकर** ( कोल्हापूर )—मराठींतील प्रथमश्रेणींचे प्राथितयश साहित्यिक.

**प्रा. त्र्यंबक शंकर शेजवलकर** ( पुणें ) — डेक्कन कॉलेज पोस्टग्रॅज्युएट ॲन्ड रिसर्च इन्स्टिट्यूट या संस्थेंत मराठा इतिहासाचे प्राध्यापक. ' Panipat:1761 ' या संशोधनात्मक ग्रंथाचे कर्ते. ' प्रगति ' साप्ताहिकाचे संपादक म्हणून त्यांनीं केलेल्या लिखाणांपैकीं ' शेजवल-करांचे लेख ( भाग १ ला ) ' पुस्तकरूपानें प्रसिद्ध आहे.

**आचार्य शं. द. जावडेकर**—सुप्रसिध्द राज्यनीतिशास्त्रज्ञ. ' आधुनिक भारत ', ' हिंदु-मुसलमान ऐक्य ' इत्यादि ग्रंथांचे लेखक आणि ' नवभारताचे ' एक संपादक.

**श्री. श्री. रा. टिकेकर** ( मुंबई )--'मुसलमानी मुलुखांतील मुशाफिरी',' सिंहाला शह ', ' बातमीदार ' इत्यादि ग्रंथांचे कर्ते.

**तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी** ( वाई )—धर्मकोशाचे मुख्य संपादक, ' हिंदु-धर्म-समीक्षा ', ' जडवाद ', ' महात्मा जोतिबा फुले ' इत्यादि ग्रंथांचे कर्ते.

**श्री. ह. कृ. मोहनी,** ( नागपूर )-- ' तेजस्वी शिक्षण', ' आमचा सनातन धर्म ' इत्यादि पुस्तकांचे लेखक, ' नवभारताचे ' एक संपादक.

**श्री. द. ग. येरवडेकर,** एम्. ए. एल्एल्. बी. ( पुणें )--संपादक, ' व्यापारी महाराष्ट्र', 'ना. गोपाळ कृष्ण गोखले ' या पुस्तकाचे लेखक.

# वाकाटक नृपति सर्वसेन याचें हरिविजय काव्य

प्रा. वा. वि. मिराशी

निसर्गभिन्नास्पदमेकसंस्थमस्मिन्द्वयं श्रीश्च सरस्वती च ।
—कालिदास, रघुवंश ६. २९.

## भारतीय इतिहासांतील सुवर्णयुग

प्राचीनें भारतीय इतिहासांत खिस्तोत्तर चौथ्या व पांचव्या शतकांच्या कालाला सुवर्णयुग अशी संज्ञा देण्यांत येते. कारण, या काळांत हिंदुस्थानाचा इतर देशांशीं व्यापार वाढून देशांत सुबत्ता झाली, सर्वत्र शांतता व सुव्यवस्था प्रस्थापित होऊन स्थापत्य, शिल्पकला, चित्रकला इत्यादि कलांना उत्तेजन मिळालें आणि संस्कृत व प्राकृत वाङ्मयाची अभिवृद्धि झाली. याचें श्रेय मुख्यत: गुप्त व वाकाटक राजवंशांना देण्यांत येतें. कारण, या कालांत उत्तरेंत जसें गुप्तांचें तसें दक्षिणेंत वाकाटकांचें साम्राज्य पसरलें होतें. या दोन्ही वंशांतील राजे सामान्यत: शूर, न्यायी, विद्वान् व कलाभिज्ञ असून त्यांचा विद्वानांना व कलावंतांना उदार आश्रय होता. यांपैकीं कांहीं तर उत्कृष्ट कवी होते. सुविख्यात गुप्तसम्राट् समुद्रगुप्त याला त्याच्या उत्कृष्ट काव्यांमुळें 'कविराज' अशी सार्थ पदवी मिळाली होती. त्याच्या काव्यांतील सुंदर कल्पना आत्मसात् करून त्या आपल्या ग्रंथांत योजण्यांत विद्वानांना धन्यता वाटे, इत्यादि वर्णनें तत्कालीन लेखांत आढळतात. त्याचा मुलगा द्वितीय चन्द्रगुप्त विक्रमादित्य यानें तर उज्जयिनीच्या विद्वत्सभेपुढें स्वत: परीक्षा दिली होती, अशी आख्यायिका राजशेखरानें आपल्या काव्यमीमांसेंत दिली आहे. कवींद्रवचनसमुच्चयादि प्राचीन सुभाषितसंग्रहांत कांहीं सुभाषितें विक्रमादित्याच्या नांवावर दिलीं आहेत. तीं या चन्द्रगुप्त-विक्रमादित्याचीं असावीं. त्यांवरून त्याच्या काव्यप्रतिभेची प्रतीति येते. दक्षिणेंतले वाकाटक नृपतीहि काव्यरचनेंत मागें नव्हते. त्यांच्या कारकीर्दींत विदर्भांत इतकीं उत्कृष्ट काव्यें निर्माण झालीं कीं त्यांच्यामुळें आलंकारिकांना वैदर्भी नामक विशिष्ट रीति मानावी लागली. तींतील उत्कृष्ट गुणांमुळें तिला सर्वश्रेष्ठ रीति मानण्यांत आलें. कविकुलगुरु कालिदास हा माळव्यांतला कवि; पण त्यालाहि वैदर्भी रीतीची श्रेष्ठता पटून त्यानें आपलीं सर्व काव्यें व नाटकें याच रीतींत लिहिलीं. त्याचें मेघदूत हें काव्य तर तत्कालीन वाकाटक राजधानीजवळच्या रामगिरीवर लिहिलें होतें हें प्रस्तुत लेखकानें इतरत्र[२] दाखविलें आहे. दुर्दैवानें विदर्भांतील कालिदास-पूर्वकालीन संस्कृत काव्यें कालाच्या उदरांत गडप झालीं आहेत; तथापि त्या काळचीं कांहीं सुभाषितें अद्यापि सुभाषितसंग्रहांत अवशिष्ट राहिलीं आहेत व विशेष उल्लेखनीय गोष्ट ही कीं त्यांपैकीं एक वाकाटक युवराज दिवाकरसेन याच्या नांवावर दिलें आहे.[३]

१ प्रस्तुत लेख हा भारत-इतिहाससंशोधक मंडळाच्या ३३ व्या संमेलनांत वाचलेला निबंध होय.
२ सह्याद्रि, वर्ष १० वें, पृ. २२१-२२६. ३ श्रीधरदासाचें सदुक्तिकर्णामृत, २, ३१, ४.








संस्कृत काव्यांप्रमाणें प्राकृत काव्यांचीहि निर्मिति या काळांत झाली होती. किंबहुना खिस्तोत्तर पहिल्या चारपांच शतकांत विदर्भांत प्राकृत काव्यकलेलाच जास्त बहर आला होता. सातवाहन व वाकाटक या दोन राजवटींत राजापासून रंकापर्यंत ज्याला म्हणून कांहीं प्रतिभा होती त्यानें प्राकृतांत सुभाषितरचना केली होती. त्यांपैकीं सातशें सुभाषितांचा संग्रह सातवाहन नृपति हाल याच्या नांवावर गाथासप्तशती या नांवानें अद्यापि प्रसिद्ध आहे. पण या गाथा मुक्तक रूपाच्या आहेत. याशिवाय प्राकृत महाकाव्येंहि त्या काळांत निर्माण झालीं. सध्यां अवशिष्ट असलेल्या प्राकृत महाकाव्यांत सेतुबंध किंवा रावणवहो हें अत्यंत प्राचीन समजलें जातें. हें प्रवरसेनानें रचलें असें सुप्रसिद्ध संस्कृत कवि बाणभट्ट यानें आपल्या हर्षचरिताच्या एका प्रास्ताविक श्लोकांत म्हटलें आहे. हा प्रवरसेन वाकाटक वंशांतील द्वितीय प्रवरसेन होय. हा, गुप्तसम्राट् जो द्वितीय चन्द्रगुप्त-विक्रमादित्य त्याचा दौहित्र असून कालिदासाचा समकालीन होता. किंबहुना कालिदासानें स्वतःच सेतुबंध काव्य विक्रमादित्याच्या आज्ञेनें रचलें अशीहि आख्यायिका त्या काव्याच्या एका टीकाकारानें दिली आहे. तिजमध्यें किती तथ्य आहे हें सांगतां येत नाहीं. तथापि तें काव्य विदर्भांत रचलें गेलें यांत संशय नाहीं. या काव्याची दंडी, बाण, आनंदवर्धन इत्यादि ग्रंथकारांनीं मुक्तकंठानें स्तुति केली आहे. या काव्यासारखेंच हरिविजयनामक प्राकृत काव्य वाकाटककाळीं रचलें गेलें होतें व त्याचा कर्ता सर्वसेन हाहि प्रवरसेनाप्रमाणें वाकाटक नृपति होता हें प्रस्तुत लेखांत दाखवावयाचें आहे.

सेतुबंध काव्य सध्यां उपलब्ध असून निर्णयसागर छापखान्यांत छापलें आहे. त्यामुळें त्यांतील कथानक, काव्यगुण वगैरेंविषयीं लोकांना माहिती आहे. हरिविजयाचें तसें नाहीं. हें काव्य सध्यां उपलब्ध नाहीं. म्हणून आनंदवर्धन, भोज, कुन्तक वगैरे संस्कृत आलंकारिकांच्या ग्रंथांतील तद्विषयक उल्लेखांवरून व त्यांतून उद्धृत केलेल्या उदाहरणांवरून त्याच्या कथानकाविषयीं अनुमानानें माहिती जमवावी लागते. त्याचा कर्ता सर्वसेन याच्याविषयीं तर सहासात वर्षांपूर्वी कांहींच माहिती नव्हती. सन १९३९मध्यें वऱ्हाडांतील अकोला जिल्ह्यांत वाशीम येथें एक ताम्रपट सांपडला. तो सर्वसेनाचा पुत्र वाकाटक नृपति द्वितीय विन्ध्यशक्ति यानें दिला असून त्यावरून सर्वसेनाचें नांव प्रथमच ज्ञात झालें. तो लेख प्रस्तुत लेखकानें एपिग्राफिया इंडिकामध्यें प्रकाशित केला आहे. अजंटा येथील सोळा नंबरच्या लेण्यांत एक वाकाटककालीन कोरीव लेख आहे त्यांतहि सर्वसेनाचें नांव आलें आहे. पण तो लेख सध्यां अत्यंत जीर्ण अवस्थेंत असल्यामुळें डॉ. भाऊ दाजी, पं. भगवानलाल इंद्रजी, डॉ. बुल्हर वगैरे विद्वानांनीं त्या ठिकाणीं रुद्रसेन असें वाचलें होतें. तो लेखहि प्रस्तुत लेखकानें हैदराबाद–पुराणवस्तु–संशोधन–खात्याच्या ग्रंथमालेंत प्रसिद्ध केला आहे. या दोन लेखांवरून सर्वसेनाविषयीं माहिती मिळते ती खालीं दिली आहे.

## सर्वसेनाची राजधानी वत्सगुल्म ( वाशीम )

सर्वसेन हा वाकाटक वंशाचा मूळ पुरुष पहिला विंध्यशक्ति याचा नातू व विख्यात सम्राट् पहिला प्रवरसेन याचा मुलगा. सातवाहन वंशाचा इ. स. २५०च्या सुमारास लय झाल्यावर विंध्यशक्तीनें विदर्भांत आपलें राज्य स्थापलें. त्याचा पुत्र पहिला प्रवरसेन हा अत्यंत बलाढ्य होता. यानें अनेक वाजपेय यज्ञ केल्याचा पुराणांत उल्लेख आहे. वाकाटकांच्या कोरीव लेखांतहि यानें अनेक श्रौत यज्ञ व चार अश्वमेध केले होते असें म्हटलें आहे. याचें साम्राज्य दक्षिणच्या पठारावर नर्मदेपासून तुंगभद्रेपर्यंत पसरलें होतें. याला चार पुत्र होते. त्यांच्यामध्यें प्रवरसेनाच्या निधनानंतर त्याच्या विस्तृत साम्राज्याची वांटणी झाली.

---

४ एपिग्राफिया इंडिका, पु. २६, पृ. १३७–१५५.

५ हैदराबाद आर्किऑलॉजिकल सीरीज, नं. १४.










सर्वांत वडील मुलगा गौतमीपुत्र हा अगादेरच निवर्तला होता. त्याचा मुलगा पहिला रुद्रसेन याला उत्तर विदर्भ मिळाला. त्यानें आपली राजधानी नागपुरजवळ नन्दिवर्धन येथें केली. दुसरा मुलगा सर्वसेन याच्या वांट्यास दक्षिण विदर्भ—सातमाला पर्वतराजीच्या दक्षिणचें गोदावरी नदीचें खोरें, ज्यामध्यें अकोला, यवतमाळ, परभणी, नान्डेड, अदिलाबाद इत्यादि जिल्ह्यांतील प्रदेश अन्तर्भूत होतो तो—आला. त्यानें आपली राजधानी वत्सगुल्म (सध्यांचें अकोला जिल्ह्यांतील वाशीम) येथें स्थापिली. दुसऱ्या दोन पुत्रांच्या वंशजांचे लेख अद्यापि मिळाले नसल्यामुळें ते नक्की कोणत्या प्रदेशावर राज्य करीत होते तें सांगतां येत नाहीं. बहुधा ते गोदावरीच्या दक्षिणेस दक्षिण महाराष्ट्रांत— ज्याला पूर्वी कुन्तल अशी संज्ञा होती त्या प्रदेशांत— राज्य करीत असावे. पुढें लवकरच त्या भागांत राष्ट्रकूट घराण्याचा उदय झाला, त्यामुळें या दोन वाकाटक शाखांचा अस्त झाला असावा.

वत्सगुल्म शहर वाकाटकांच्या अंमलाखालीं अत्यंत भरभराटलें. येथें संस्कृत व प्राकृत वाङ्मयांचा व कलाकौशल्याचा इतका उत्कर्ष झाला कीं तें नगर भगवान् मदनाचें क्रीडास्थान मानण्यांत येऊं लागलें असें राजशेखरानें आपल्या काव्यमीमांसेंत म्हटलें आहे. वत्सगुल्म शाखेचा शेवटचा ज्ञात वाकाटक राजा हरिषेण याच्या काळीं अजंटा येथें कोरविलेलीं सोळा, सतरा व एकोणीस नंबरचीं लेणीं अद्यापिहि तेथल्या सर्व लेण्यांत, भव्यता, कलाकुसरी, शिल्पें, चित्रें इत्यादिकांत अप्रतिम गणलीं जातात. वत्सगुल्म नगरींत रचलेल्या काव्यांमुळें वत्सगुल्मी (प्राकृत वच्छोमी) नामक रीति वैदर्भीचा पर्याय म्हणून प्रसिद्ध झाली. वच्छोमी रीतीचा उल्लेख राजशेखरानें आपल्या कर्पूरमञ्जरी—नामक प्राकृत नाटकांच्या मंगलश्लोकांत केला आहे.

## वाकाटक नृपति सर्वसेन हाच 'हरिविजया'चा कर्ता

हरिविजय काव्य सर्वसेनानें रचलें अशी माहिती आनंदवर्धनाच्या ध्वन्यालोकावरून आपणांस मिळते. तथापि सर्वसेन वाकाटक नृपति होता हें अद्यापपर्यंत माहीत नव्हतें. वक्रोक्तिजीवितकार कुंतक यानेंहि सर्वसेनाचा उल्लेख केला आहे; पण त्यानेंहि तो राजा होता असें म्हटलेलें नाहीं. तेव्हां केवळ नामसादृश्यावरून तो वाकाटक नृपति होता असें मानणें योग्य होणार नाहीं अशी शंका कदाचित् उत्पन्न होईल. सुदैवानें या बाबतींत निर्णायक पुरावा उपलब्ध आहे. सुप्रसिद्ध संस्कृत कवि दण्डी याचें अवन्तिसुन्दरीकथा नामक गद्यकाव्य सुमारें वीस वर्षांपूर्वीं दक्षिण-भारती-ग्रंथमालेंत प्रसिद्ध झालें आहे; त्याच्या आरंभीं प्राचीन कवींच्या स्तुतिपर असे कांहीं प्रास्ताविक श्लोक आढळतात, त्यांमध्यें सर्वसेनाविषयीं खालील श्लोक आला आहेः—

राज्ञा श्रीसर्वसेनेन... ।
...विजयं हरेः ॥

या ग्रंथाचें एकच हस्तलिखित प्राप्त झालें आहे व त्याचा पुष्कळ भाग किड्यांनीं खाऊन टाकला असल्यामुळें वाचतां येत नाहीं. वरील श्लोकाचाहि बराच भाग वरील कारणानें नष्ट झाला आहे; तथापि सुदैवानें त्यांतील अत्यंत महत्त्वाचा भाग अवशिष्ट राहिला आहे, त्यावरून हरिविजय काव्य सर्वसेन नामक राजानें रचलें होतें ही अन्यत्र दुष्प्राप्य अशी माहिती मिळते. या पद्यमय प्रस्तावनेंतील इतर कविप्रशंसापर श्लोकांचें निरीक्षण केल्यास ते त्या त्या कवींच्या कालक्रमानुसार घातले आहेत असें ध्यानांत येतें. या श्लोकांमध्यें सर्वसेनाच्या स्तुतीचा श्लोक भासाच्या प्रशंसेनंतर व सेतुकाव्याचा (अर्थात् सेतुबंधकाव्याचा) कर्ता (प्रवरसेन) व कालिदास यांच्या स्तुतीच्या पूर्वी

६ 'तत्रास्ति मनोजन्मनो देवस्य क्रीडावासो विदर्भेषु वत्सगुल्मं नाम नगरम् ।'—राजशेखर, काव्यमीमांसा, (गायकवाड–प्राच्यग्रंथमाला पृ. १०)

घातला आहे. यावरून सर्वसेन हा भासानंतर व प्रवरसेन कालिदासापूर्वी होऊन गेला असावा असें अनुमान करतां येतें.

भारतीय इतिहासांत आपणांस एकच सर्वसेन ज्ञात आहे. तो वाकाटकांच्या वत्सगुल्म शाखेचा संस्थापक होता हें मागें दाखविलें आहे. तो इ. स. ३३० ते ३५० या काळांत होऊन गेला असावा. अर्थात् तो इ. स. ४०० ते ४५० या काळांत होऊन गेलेल्या कालिदास-प्रवरसेनांपेक्षां प्राचीन होता यांत संशय नाहीं व हेंच अवन्तिसुन्दरी कथेंतील प्रास्ताविक श्लोकांच्या क्रमावरूनहि दिसतें. तेव्हां वाकाटक नृपति सर्वसेन हाच हरिविजय काव्याचा कर्ता होता असें निर्विवादपणें म्हणतां येतें.

## 'हरिविजया'चें कथानक

आतां हरिविजय काव्याविषयीं काय माहिती मिळते तें पाहूं या. हरिविजय काव्याचा उल्लेख अनेक संस्कृत कवींनीं व आलंकारिकांनीं केला आहे. कांहींनीं त्यांतील पद्यैंहि उद्धृत केलीं आहेत, तर कांहींनीं त्यांतील वर्ण्यविषयांचा निर्देश केला आहे. इ. स.च्या सातव्या शतकांतल्या दण्डीनें केलेली प्रशंसा मागें दिली आहे. पण तो श्लोक आतां अत्यंत त्रुटित झाल्यामुळें त्यावरून आपणांस जास्त माहिती मिळत नाहीं. यानंतर नवव्या शतकांतला विख्यात आलंकारिक आनंदवर्धन यानें हरिविजयाचा उल्लेख अनेक ठिकाणीं केला आहे. "कवीनें एकादें ऐतिहासिक कथानक आपल्या काव्याचा विषय म्हणून पसंत केलें असल्यास त्यांतील इष्टरसविरोधी प्रसंग गाळून तद्रसपरिपोषक अशा काल्पनिक घटनांची योजना करावी.[7] कारण, कवीला आपल्या काव्यामध्यें रसोत्पत्ति करावयाची असते, इतिहास शिकवावयाचा नसतो," असा उपदेश आनंदवर्धनानें केला आहे. व याचीं उदाहरणें म्हणून कालिदासाच्या प्रबंधांचा व सर्वसेनकृत हरिविजयाचा निर्देश केला आहे. हरिविजयांत वर्णिलेलें मूळ ऐतिहासिक कथानक कोणतें, त्यांतील कोणता भाग सर्वसेनानें गाळला व कोणते प्रसंग नवीन घातले ही माहिती आनंदवर्धनाच्या ग्रंथावरून आपणांस मिळत नाहीं; पण ती त्याचा टीकाकार सुविख्यात काश्मिरी ग्रंथकार अभिनवगुप्त याच्या टीकेंतील एका विधानावरून आपणांस मिळते. अभिनवगुप्त म्हणतो, 'हरिविजयांत पारिजातहरणाचा प्रसंग पत्नीच्या अनुनयाकरितां योजिला आहे; पण इतिहासावरून तसें दिसत नाहीं.' या विधानावरून श्रीकृष्णानें इंद्रावर स्वारी करून पारिजात वृक्ष भूतलीं आणला, या कथानकावर हरिविजय काव्याची रचना झाली होती हें उघड आहे. या कथानकाचें मूळचें रूप काय होतें तें निश्चितपणें सांगतां येत नाहीं. महाभारतांत दोन ठिकाणीं श्रीकृष्णप्रशंसेंत पारिजातहरणाचा उल्लेख आला आहे; पण तेथें तें सत्यभामेच्या अनुनयाकरितां केलें होतें असा निर्देश नाहीं. सध्यांच्या हरिवंशाच्या मुंबई-पाठांत या कथेचीं दोन रूपें दिसतात. पहिलें रूप विष्णुपर्वाच्या ६४व्या अध्यायांत आढळतें. त्यांत वर्णिलें आहे कीं, श्रीकृष्ण नरकासुराचा वध करून सत्यभामेसह स्वर्गांत गेला. तेथें इंद्राच्या उद्यानांत पारिजातक वृक्ष पाहून त्यानें तो उपटून गरुडावर घातला व आपल्याबरोबर द्वारकेस आणला. मागाहून इंद्राला तें समजल्यावर त्यानें कृष्णाच्या त्या कृत्याला संमति दिली. पारिजातहरणाच्या कथेचें हें साधें रूप प्राचीन दिसतें व एका श्लोकावरून[10] (द्रोणपर्व अ.

७ इतिवृत्तवशायातां कथञ्चिद्रसाननुगुणां स्थितिं त्यक्त्वा पुनरुत्प्रेक्ष्याभीष्टरसोचितकथोन्नयो विधेयः यथा कालिदासप्रबन्धेषु। यथा च सर्वसेनविरचिते हरिविजये।

—ध्वन्यालोक, तृतीयोद्घात.

८ हरिविजये कान्तानुनयाङ्गत्वेन पारिजातहरणादि निरूपितमितिहासेष्वदृष्टमपि। —ध्वन्यालोकलोचन, तृतीयोद्योत.

९ उद्योगपर्व, अ. १३०, श्लो. ४९; द्रोणपर्व, अ. ११, श्लो. २२-२३.

१० महेन्द्रभवनाद्वीरः पारिजातमुपानयत्। तच्च मर्षितवान् शक्रो जानंस्तस्य पराक्रमम्॥








११, श्लो. २३ ) हेंच रूप महाभारत–कर्त्यालाहि माहीत होतें असें दिसतें. याच कथेचें दुसरें विस्तृत रूप हरिवंशाच्या ६५–७५ या अकरा अध्यायांत वर्णिलें आहे व तेंच आपणांसर्वांना परिचित आहे. ती कथा अशीः—एके दिवशीं नारदानें स्वर्गीय पारिजाताचीं फुलें कृष्णास अर्पण केलीं, तीं त्यानें रुक्मिणीस दिलीं. तें समजल्यावर सत्यभामा रागावली. तिला प्रसन्न करण्याकरितां कृष्णानें पारिजात वृक्ष स्वर्गांतून खालीं आणण्याचें तिला वचन दिलें व इंद्राचा पराजय करून तें पार पाडलें. मूळ कथानकांत प्रियानुनय हें पारिजातहरणाचें कारण म्हणून दाखविलें नव्हतें; त्या प्रसंगाची योजना सर्वसेनानें प्रथम आपल्या हरिविजय काव्यांत रसोत्पत्तीकरितां केली हें अभिनवगुप्ताच्या टीकेवरून स्पष्ट दिसतें. पुढें तो प्रसंग हरिवंशादि ग्रंथांत घातला गेला असावा. कालिदासाच्या शाकुंतलांतील कांहीं प्रसंग व शारद्वत, शार्ङ्गरव, प्रियंवदा, गौतमी इत्यादि पात्रेंहि पद्मपुराणांत घेतलेलीं आढळतात, तसाच प्रकार याहि बाबतींत झालेला दिसतो.

## ' हरिविजया 'संबंधींचे उल्लेख

आनंदवर्धनानें दुसऱ्या एका ठिकाणीं हरिविजयाचा उल्लेख केला आहे. ध्वनिकाव्याच्या एका प्रकाराचें उदाहरण देतांना त्यानें खालील गाथा हरिविजयांतील म्हणून दिली आहेः—

चूअंकुरावअंसं
छणमप्पसरमहग्घणमणहरसुरामोअम् ।
असमप्पिअं पि गहिअं
कुसुमसरेण महुमासलच्छिमुहम् ॥[11]

वसंतऋतूच्या आरंभीं आम्रमंजरी फुटून सर्वत्र सुगंध दरवळला असतां मदन कामिजनांचा चित्तविक्षेप करतो ही कल्पना या गाथेंत आलंकारिक भाषेंत ग्रथित केली आहे. या गाथेवरून हरिविजय काव्य महाराष्ट्री–प्राकृत भाषेंत रचलें होतें असें स्पष्ट दिसतें. ' सज्जेइ सुरहिमासो ' इत्यादि आणखीहि एक वसंतऋतुपर गाथा आनंदवर्धनानें उदाहरण म्हणून दिली आहे. ती हरिविजयांतून घेतली असा स्पष्ट निर्देश नसला तरी ती त्या काव्यांतीलच असावी. कारण, त्या काव्यांत वसंतऋतूचें वर्णन आलें होतें हें वरील गाथेवरून तसेंच हेमचंद्राच्या काव्यानुशासनांतील उल्लेखावरून स्पष्ट दिसतें.

यानंतरचा सर्वसेनाचा उल्लेख दहाव्या शतकांतल्या कुन्तकाच्या वक्रोक्तिजीवितांत आढळतो. कुन्तकानें काव्याच्या शैलीचे किंवा मार्गाचे वैचित्र्यमार्ग, सुकुमारमार्ग व मध्यम मार्ग असे तीन प्रकार मानले आहेत. त्यांपैकीं सुकुमारमार्गाचीं उदाहरणें म्हणून कालिदास, सर्वसेन इत्यादिकांचीं काव्यें पाहावीं, तीं सहज सौकुमार्यानें अत्यंत सुंदर झालीं आहेत[12] असें म्हणून कुन्तकानें सर्वसेनाला कालिदासाच्या जोडीस बसविलें आहे. यानंतर अकराव्या शतकांतील सुप्रसिद्ध धारानृपति भोज यानें आपल्या सरस्वतीकण्ठाभरण व शृंगारप्रकाश या दोन्ही अलंकारग्रंथांत हरिविजयांतून अनेक गाथा उद्धृत केल्या आहेत. त्यांपैकीं एकै उदाहरणार्थ घेऊंः—

सुरकुसुमेहिं कलुसिअं
जइ तेहिं चिअ पुणो पसाएमि तुमं ।
तो पेम्मस्स किसोअरि
अवराहस्स अ ण मे कअं अणुरूपं ॥[13]

या गाथेचा संदर्भ भोजानें दिलेला नाहीं; तथापि अर्थाकडे लक्ष देतां ही गाथा कृष्णानें सत्यभामेला उद्देशून म्हटली असावी असें दिसतें.

---

११ ध्वन्यालोक (हरिदास-संस्कृतग्रंथमाला) पृ. २९८, छाया–चूताङ्कुरावतंसं क्षणप्रसरमहार्घमनोहरसुरामोदम् । असमर्पितमपि गृहीतं कुसुमशरेण मधुमासलक्ष्मीमुखम् ॥

१२ एवं सहजसौकुमार्यसुभगानि कालिदाससर्वसेनादीनां काव्यानि दृश्यन्ते ।

१३ सरस्वतीकण्ठाभरण ( निर्णयसागर–प्रत ) पृ. ६५५. छाया–सुरकुसुमैः कलुषितां यदि तैरेव पुनः प्रसादयामि त्वाम् । ततः प्रेम्णः कृशोदरि अपराधस्य च न मे कृतमनुरूपम् ॥

कृष्ण म्हणतो, ' कृशोदरि सत्यभामे! मीं रुक्मिणीला पारिजातपुष्पें दिलीं म्हणून तूं रागावलीस. आतां तुला प्रसन्न करण्याकरितां मीं तींच पुष्पें तुला आणून दिलीं तर माझें कृत्य तुझ्यावरील माझ्या प्रेमाला व माझ्या अपराधाला साजेसें होणार नाहीं; ' म्हणून ' मी पारिजात वृक्षच आणून तुझ्या अंगणांत लावतों ' असा कृष्णाचा अभिप्राय दिसतो.

यानंतर अकराव्या शतकांतल्या अभिनवगुप्तालाहि हरिविजय काव्य माहीत होतें हें मागें दाखविलें आहेच. तदुत्तरकालीन बाराव्या शतकांत होऊन गेलेल्या हेमचन्द्रानें तर आपल्या काव्यानुशासनावरील टीकेंत हरिविजयाचा ठिकठिकाणीं उल्लेख केला आहे. त्यावरून त्या काव्याविषयीं खालील माहिती मिळते:—

हरिविजय हें काव्य आरंभापासून अखेरपर्यंत एकाच स्कन्धक नामक छंदांत रचलें होतें. त्यांत कांहीं ठिकाणीं दिसणाऱ्या गलितक छंदांतील गाथा दुसऱ्या कोणीं तरी प्रक्षिप्त केल्या होत्या. त्याच्या प्रत्येक सर्गाच्या शेवटच्या गाथेंत 'उत्साह' शब्द ग्रथित केला होता. त्याचें कथानक सत्यभामेला प्रसन्न करण्याकरितां इन्द्राचा पराजय करून कृष्णानें पारिजात वृक्ष स्वर्गांतून भूमीवर आणला असें होतें. कृष्णानें प्रथम सात्यकीला आपला निसृष्टार्थ दूत म्हणून शिष्टाई करण्याकरितां इन्द्राकडे पाठविलें; पण इन्द्र त्याचें ऐकेना म्हणून त्यानें त्याच्यावर स्वारी केली. हरिविजयांत नगरवर्णन, नायक—वर्णन, वसन्तऋतुवर्णन, सूर्यास्तवर्णन, वाहनवर्णन इत्यादि विषय आले होते.

वरील विवेचनावरून हरिविजय काव्य प्राकृतांत असलें तरी रघुवंश, किरातार्जुनीय, शिशुपालवध इत्यादि संस्कृत महाकाव्यांप्रमाणेंच त्याचें स्वरूप होतें व महाकाव्यांत जरूर असणाऱ्या सर्व विषयांचें वर्णन त्यांत आलें होतें हें दिसून येईल. किंबहुना हें काव्य विद्यमान सर्व संस्कृत व प्राकृत काव्यांत प्राचीनतम असल्यानें त्यानेंच महाकाव्यरचनेची प्रथा पाडून दिली असावी असेंहि अनुमान करण्यास हरकत नाहीं.

दुर्दैवानें हें काव्य सध्यां उपलब्ध नाहीं. कांहीं वर्षांपूर्वी कै. रा. ब. हिरालाल यांनीं मध्यप्रांतवऱ्हाडांतील हस्तलिखित ग्रंथांची यादी प्रसिद्ध केली. तींत सर्वसेनाच्या हरिविजयाचें हस्तलिखित नागपूरकर भोंसले राजांच्या संग्रहीं आहे असा निर्देश होतो. म्हणून भोसले राजांच्या परवानगीनें मीं दोन्ही पातींचे हस्तलिखितसंग्रह चाळून पाहिले. पण त्यांत तें हस्तलिखित दिसलें नाहीं; रा. ब. हिरालाल यांनींहि तें पाहिलें असावें असें वाटत नाहीं. हस्तलिखितांची यादी करण्याकरितां नेमलेल्या गृहस्थानें भोंसल्यांच्या संग्रहांत श्रीधरकविकृत मराठी हरिविजयाच्या पोथ्या पाहून हरिविजयाचें नांव त्यांना कळविलें असावें व त्यांनीं ऑफ्रेक्टच्या हस्तलिखित ग्रंथसूचीचा उपयोग करून तें हरिविजय काव्य सर्वसेनकृत आहे असा निर्देश आपल्या सूचींत केला असावा. पण तो चूक होता हें वरील विवेचनावरून दिसून येईल. प्रस्तुत लेखांत गोळा केलेल्या माहितीवरून तें हरिविजय काव्य कोणाच्या संग्रहीं असल्यास त्यास तें प्रकाशित करण्याची सुबुद्धि होईल अशी मला आशा आहे.

## सर्वसेनानें केलेली प्राकृत सुभाषित—रचना

सर्वसेनानें केवळ हरिविजय काव्यच लिहिलेलें नसून कांहीं प्राकृत सुभाषितेंहि रचलीं होतीं असें दिसतें. गाथासप्तशती किंवा सत्तसई नामक प्राकृतसुभाषितसंग्रह प्रसिद्ध आहे. हा ग्रंथ इ. स.च्या पहिल्या—दुसऱ्या शतकांत होऊन गेलेल्या हाल नामक सातवाहनवंशी राजानें रचला अशी परंपरागत समजूत असली तरी त्यांत अनेक उत्तरकालीन कवींच्या गाथा समाविष्ट झाल्या आहेत हें त्यांतील कविनामांच्या उल्लेखांवरून स्पष्ट दिसतें. निर्णयसागरनें छापलेल्या गाथासप्त-

१४ काव्यानुशासन ( सं. रसिकलाल छोटालाल पारीख ) भाग १, पृ. ४५७–४६१.

१५ डॉ. हिरालालकृत मध्यप्रांतवऱ्हाडमधील संस्कृत व प्राकृत हस्तलिखितांची यादी, पृ. १९९.

शतींतील कविनामांच्या सूचींत सर्वसेनाचें नांव दिसत नाहीं. पण अलीकडे पंजाबमध्यें सप्तशतीच्या कांहीं भागावरील पीतांबराची टीका छापली आहे तिजवरून निर्णयसागर-प्रतींतील क्रमांक ५०४ व ५०५ या गाथा सर्वसेनानें रचल्या होत्या असें दिसतें. भुवनपाळ नामक दुसऱ्या एका टीकाकारानें २१७ व २३४ या आणखी दोन गाथा सर्वसेनाच्या नांवावर दिल्या आहेत. यावरून सर्वसेनानें प्राकृतसुभाषितेंहि रचलीं होतीं व त्यांतील कांहीं गाथासप्तशतींत घेतलीं गेलीं असें स्पष्ट दिसतें. या सुभाषितांतहि सर्वसेनाचे प्रतिभा, मार्मिक निरीक्षण व समर्पक शब्दयोजना इत्यादि गुण आढळतात. उदाहरणार्थ एक गाथा घेऊं:—

जस्स जहं चिअ पढमं
तिस्सा अंगम्मि णिवडिआ दिट्ठी।
तस्स तहिं चेअ ठिआ
सव्वंगं केण विण दिट्ठम्॥

एका अत्यंत सुंदर स्त्रीला पाहून येण्यासाठीं पाठविलेल्या आपल्या सहचरांना नायकानें तिच्या रूपाविषयीं विचारलें असतां ते म्हणतात, 'आमच्यापैकीं प्रत्येकाची तिच्या अवयवावर जेथें प्रथम दृष्टि पडली तेथेंच ती खिळून राहिली. तिचें समग्र रूप कोणींच पाहिलें नाहीं.' शब्द-योजना साधीच पण किती अर्थवाही आहे!

समुद्रगुप्त, चंद्रगुप्त, प्रवरसेन, हर्ष, मुंज, भोज इत्यादि प्रथितयश भारतीय राजांच्या मालिके-मध्यें सर्वसेनाचें स्थान आहे. या राजांप्रमाणें सर्वसेनानेंहि आपल्या काव्यनिर्मितीनें उज्ज्वल कीर्ति मिळविली होती. सामान्यतः एकत्र न राहणाऱ्या लक्ष्मी व सरस्वती या देवतांचें मधुर मीलन त्याच्या ठिकाणीं झालें होतें. त्याच्या काळानंतर सातआठशें वर्षें इ. स.च्या बाराव्या शतकापर्यंत त्याचें काव्य लोकप्रिय होतें. पुढें प्राकृत भाषा हळूहळू दुर्बोध होत चालल्यामुळें हरिविजय काव्य मागें पडलें व कालांतरानें सर्वसेनाचें नांवहि लोकांच्या स्मरणांतून गेलें. प्रस्तुत लेखांत त्याच्या ग्रंथावरचा विस्मृतीचा पडदा किंचित् दूर करण्याचा प्रयत्न केला आहे. यापुढें या प्रथितयश आद्य प्राकृत कवीविषयीं उत्तरोत्तर जास्त माहिती उपलब्ध होऊन त्याच्या सुंदर काव्यांचीं हस्तलिखितें प्रकाशांत येतील अशी आशा व्यक्त करून हा लांबलेला लेख पुरा करतों.

१६ वेबरकृत Indische Studien या ग्रंथमालेचा भाग १६वा, पृ. २३. हे गाथांचे क्रमांक निर्णयसागर-आवृत्तीप्रमाणें आहेत.

---

## आंतून धार्मिकच—

ज्या धार्मिक लोकांशी माझी गांठ पडते त्यांपैकीं बहुतेक लोक वरून धार्मिक पण आंतून राजकारणी असतात. मी मात्र वरून दिसावयास जरी राजकारणी असलों तरी आंतून धार्मिकच आहे.

— महात्मा गांधी









# तत्त्वज्ञानाचें साध्य

श्री. केदारनाथ

## दर्शनकारांचे मानवजातीवरील उपकार

आपल्या देशांत तत्त्वज्ञानाच्या अनेक विचार-प्रणाली आहेत. त्या प्रणालींत मूळ शोधकांच भाग किती आहे व त्यावर तर्कानें व अनुमानानें रचलेला भाग किती आहे तें शोधून काढणें कठिण आहे. तरी मूळ दार्शनिकांच्या बाबतींत विचार करतां त्यांची सत्यज्ञानाविषयींची जिज्ञासा, उत्कंठा व तळमळ, त्या बाबतींत त्यांना घ्यावे लागलेले परिश्रम, त्यांची सूक्ष्म, कुशाग्र, मर्मस्पर्शी पण व्यापक बुद्धिमत्ता, विषयाला आरपार भेदून त्याचे पलीकडे थेट सत्यापर्यंत जाऊन पोहोंचणारी त्यांची दीर्घ, भेदक व पवित्र दृष्टि वगैरे गोष्टी मनांत येऊन त्यांच्याविषयीं परम आदर वाटल्याशिवाय राहत नाहीं. भौतिक इंद्रियजन्य सुखाविषयींचें त्यांचें वैराग्य, निसर्ग-पंचमहाभूतें यांपासून तों मानवी शरीर, जन्ममृत्यू, जरा, व्याधि, मन, प्राण, चित्त वगैरेंपर्यंत झाडून सर्व स्थिरचर सृष्टीचें त्यांनीं केलेलें सूक्ष्म अवलोकन, निरीक्षण, त्याचप्रमाणें त्या सर्वांचे गुणधर्म व संस्कार यांचें ज्ञान वगैरे गोष्टी अत्यंत आश्चर्यकारक वाटतात. सर्व जग मोहांत व अज्ञानांत चांचपडत असतां तत्त्वशोधनाचे मार्गे लागून ज्या विभूतींनीं सत्याची उपासना चालविली व स्वतःस पाहिजे असलेलें ज्ञान प्राप्त करून घेतलें, ते धन्य होत यांत शंका नाहीं. महान् शोधकांना—त्या दर्शनकारांना त्यांच्या परिश्रमाचें, त्यांच्या वैराग्याचें व ज्ञाना-विषयींच्या त्यांच्या तळमळीचें फळ त्यांच्या जीवनांतच सदैव शांति व प्रसन्नता यांच्या रूपानें मिळालें असलेंच पाहिजे यांतहि शंका नाहीं. मानवजातीवर त्यांचे फार मोठे उपकार आहेत. संपूर्ण मानवजातीनें या बाबतींत त्यांचें सदैव ऋणी राहिलें पाहिजे.

## पुढें तत्त्वज्ञानाचा विकास कां थांबला ?

परंतु तत्त्वशोधनाचा भारतवर्षांतील हा प्रयत्न तसाच चालू न राहतां केव्हांपासून तरी अटकून गेल्यामुळें तत्त्वज्ञानाचा जो विकास पुढें पुढें होत राहायला पाहिजे होता तो आपल्या देशांत होऊं शकला नाहीं, असें दिसून येत आहे. याचीं कारणें काय असावीं याचा विचार करतां वाटतें कीं, तत्त्वज्ञान व मोक्ष यांचा संबंध आपण केव्हांपासून तरी मानूं लागलों व तेव्हां-पासून आपल्यांतील शोधकपणा नाहींसा होऊन आपल्यांत केवळ श्रद्धाळूपणा वाढत गेला व ज्ञानाची उपासना बंद पडली. मूळ शोधकांना व दार्शनिकांना त्यांच्या जिज्ञासेचें व परिश्रमाचें फळ ज्ञानाच्या, शांतीच्या व प्रसन्नतेच्या रूपानें मिळालें व त्यावरून त्यांची तत्त्वज्ञानविषयक विचारसरणि केवळ मान्य केल्यानें आम्हांसहि तसेंच ज्ञान, तशीच शांति व तशीच प्रसन्नता मिळतील अशी खोटी समजूत, इच्छा किंवा श्रद्धा आमच्यांत केव्हां तरी निर्माण झाली व त्याचाच हा सर्व परिणाम असावा, अशी शंका या बाबतींत विचार करतां येते. दर्शनकारांना त्यांच्या त्यांच्या तत्त्वज्ञानापासून आनंद व धन्यता वाटली असेल ती त्यांच्या शोधांत त्यांना मिळालेल्या सफलतेमुळें वाटली असली पाहिजे. तशा प्रकारची शोधकवृत्ति व शोधाचा प्रयत्न यांचा इतरांत अभाव असतां केवळ श्रद्धाळूपणें तत्त्वज्ञान मान्य केल्यामुळें ज्ञानापासून होणाऱ्या आनंदाची व धन्यतेची इच्छा त्यांनीं कशी केली असावी हाहि एक मोठा आश्चर्यकारक प्रश्न आहे. या प्रश्नावर विचार करतां वाटतें कीं, आपण तत्त्वज्ञानाचा संबंध ब्रह्मज्ञानाशीं व ब्रह्मज्ञानाचा संबंध मोक्षाशीं जोडून दिल्याचा हा परिणाम असावा.








## तत्त्वज्ञानाचें साध्य

जीवनाचें ध्येय आपण मोक्ष ठरविलेलें आहे. ज्ञानाशिवाय मोक्ष नाहीं अशी समजूत व श्रद्धा आपल्यांत प्रचलित आहे. परंपरेनें हीच श्रद्धा चालत आली असल्यानें तिचा खरेखोटेपणा तपासण्याची कल्पनाहि आपल्या मनांत कधीं येत नाहीं. तत्त्वज्ञान व मोक्ष यांचा संबंध आपण जोडून दिला व तेव्हांपासून तत्त्वज्ञान हा विषय शोधाचा, जिज्ञासेचा, खरेंखोटें पारखण्याचा राहिला नसून तो एक मान्यतेचा व श्रद्धेचा विषय होऊन गेला व त्या बाबतींत जो शोध व जो विकास होत राहायला पाहिजे तो तेव्हांपासून अटकून गेला. भौतिक विज्ञानांत ज्याप्रमाणें एकापेक्षां एक नवीन शोध निघत राहून ते शोध व त्यांतील ज्ञान जगास कांहीं बाबतींत उपयुक्त होत आहेत त्याप्रमाणें आपल्या तत्त्वज्ञानाचा उपयोग होत नाहीं, याच्या अनेक कारणांपैकीं आपली त्या विषयींची खोटी मान्यता व श्रद्धा हेंहि एक कारण असावें असें वाटतें.

### तत्त्वज्ञानाची निर्मिति कशी झाली ?

अन्य प्राण्यांपेक्षां मनुष्यांत विचारशक्ति अधिक आहे. तिचा उपयोग प्रत्येक मनुष्य योग्य दिशेनेंच करित आहे असें म्हणतां येत नाहीं; तरीहि मनुष्य इतर प्राण्यांपेक्षां विचारशील प्राणी आहे असें आपण समजतों. या विचारशीलतेंतूनच अनेक शास्त्रें, विद्या व कला यांची उत्पत्ति झाली आहे. दुःखाचा नाश करून सुखाची वृद्धि करण्याचे उपाय आपल्या बौद्धिक शक्तींतूनच मनुष्यानें निर्माण केले आहेत. सुखदुःखांचे कार्य--कारण--संबंध जाणणें व त्या ज्ञानाच्या साहाय्यानें सुख वाढवून दुःख नाहींसें करण्याकरितां उपाय शोधून काढून ते अमलांत आणण्याचा प्रयत्न करणें या सर्वांतूनच अनेक शास्त्रें व कला यांची वाढ होत आली आहे. मनुष्य--जात अगदीं प्राथमिक काळापासून याच हेतूच्या मागें लागलेली दिसून येत आहे. मानवी शरीरांत जी जी नवनवीन शक्ति आविर्भूत होत गेली त्या त्या प्रत्येक शक्तीच्या द्वारें हाच हेतु सिद्ध करण्याचा प्रयत्न आजपर्यंत मनुष्य करीत आला आहे. कर्मेन्द्रियें व ज्ञानेंद्रियें यांचे द्वारें निरनिराळ्या विषयांचा जितक्या निरनिराळ्या रीतींनीं रस घेतां येईल तितक्या रीतींनीं घेण्याचा व हरएक बाजूनें दुःखाचा संबंध टाळण्याचा मनुष्याचा प्रयत्न सदैव चालू आहे. या प्रयत्नांतून विचारी मनुष्याच्या मनांत शंका उत्पन्न झाली कीं हीं शास्त्रें या विद्या व या कला मनुष्याचें दुःख व भय सर्वस्वीं टाळून त्याला खरोखरच कायमचे सुखी करूं शकतील काय ? कितीहि प्रयत्नांनीं प्राप्त झालेलें सुख अशाश्वत असतें. सुखानुभूति क्षणिक असते व एक भय वा दुःख टाळलें तरी दुसरें पुढें उभेंच असतें. अशा प्रकारच्या मानवी जीवनांत व परिस्थितींत मनुष्य कधींतरी कायमचा निर्दुःखी व सुखी होऊं शकेल काय ? कितीहि प्रयत्न केले व अनेक प्रकारचे शोध व उपाय काढले तरी मनुष्याला वार्धक्य टळत नाहीं, व्याधि चुकत नाहीं व मृत्यु तर कोणाला कधींच टाळतां येत नाहीं. तो कोणत्या क्षणीं झडप घालील याचा तर भरंवसाच नाहीं. जगण्याची आशा मनुष्याला कधींच सुटत नाहीं. उपभोगाची--इंद्रियग्राह्य रसाची--इच्छा कधींहि क्षीण होत नाहीं. शरीर-स्वास्थ्याची इच्छा त्याला सदैव कायम असते. अशा स्थितींत जरा, व्याधि व मृत्यु यांचें भय मनुष्याला सदैव वाटत राहणारच. या बाबतींत विद्वान्--अविद्वान् हा भेद नाहीं, सबळ-निर्बळ, श्रीमंत-गरीब, राजा-रंक हा फरक नाहीं. सर्व मानव-जात या दुःखांत व भयांत कायमची सांपडलेली आहे. विचारी मनुष्याचें मन अशा प्रकारच्या शंका व प्रश्न यांमुळें अधिक विचारी बनलें.

सुखापेक्षां दुःखाचे प्रसंगीं मनुष्याचें मन अधिक जागृत होत असतें, व त्याच्या कारणांचा शोध घेण्याकडे तें वळत असतें. या कारणांमुळें विचारी मनुष्य जरा, व्याधि व मृत्यु यांबद्दल सूक्ष्मपणें विचार करूं लागला, त्यांच्या कारणांचा शोध घेऊं लागला. मृत्यूबरोबर त्याला सहजच जन्माचाहि विचार करावा लागला. जन्म, मृत्यु, जरा व व्याधि या चार अवस्थांपैकीं विशेषतः जन्म व



अनुक्रमणिका






मृत्यु यांचाच विचार त्याला करावा लागला असावा. कारण मानवी जीवनाचा एक प्रारंभ असून दुसरा शेवट आहे. जरा व व्याधि या अवस्था जन्मामुळें मनुष्यावर आलेल्या आहेत. जन्म-मृत्यूप्रमाणें त्याहि अवस्था उघड आहेत. परंतु जन्मापूर्वींची व मृत्यूनंतरची या दोन अवस्था गूढ आहेत. जन्मामुळेंच मनुष्याला मृत्यु येत असतो. म्हणून जरा, व्याधि व मृत्यु या अवस्था नको असतील तर जन्मच टाळला पाहिजे. पण जन्म-मरणांचें गूढ उकलल्याशिवाय व त्यांचीं कारणें जाणल्याशिवाय ही गोष्ट साधणार नाहीं असें विचारी मनुष्यांस वाटलें असेल. दुःख, हानि, भय, चिंता, शोक वगैरे अनेक आपत्तींतून कायमचें सुटायचें असल्यास--जरा, व्याधि, मृत्यु यांतून मुक्त व्हायचें असल्यास--जन्मच टाळला पाहिजे. म्हणून विचारी मनुष्य जन्म-मृत्यूंच्या कारणांच्या शोधाकडे लागला. मानवी जीवनांत मृत्यूइतकी भयानक, दुःखरूप व टाळण्यास अशक्य अशी दुसरी आपत्ति नाहीं. मृत्यूनेंच मनुष्याला सूक्ष्म, खोल व गंभीरपणें विचार करायला लावलें असलें पाहिजे. मृत्यूच्या कारणांचा व त्यानंतरच्या स्थितीचा विचार करतां करतां जन्माचा, त्याच्या कारणांचा, मानवी शरीर, त्याच्या निरनिराळ्या अवस्था, सृष्टि, पंचमहाभूतें, मन, बुद्धि, प्राण, चैतन्य, कर्मेंद्रियें, ज्ञानेंद्रियें, त्यांचीं कार्यें, त्यांचे परिणाम, मानवी स्वभाव, विचार, भावना, संस्कार गुणधर्म, जागृति, स्वप्न, सुषुप्ति, त्रिगुण, प्राणिवर्ग, वनस्पतिवर्ग, त्यांतील भेद-अवस्था, जीवमात्रांतील परस्पर आकर्षण-अपकर्षण वगैरे यच्चयावत् सर्व सचेतनअचेतन वस्तूंचा शोध घेत घेत त्याला आपला मार्ग काढावा लागला. शरीरांतील सुखदुःखात्मक घटना-विघटना, सृष्टींतील आपल्याला प्रिय-अप्रिय घडामोडी व विश्वाचा अव्याहतपणें चालणारा प्रचंड कारभार या सर्वांचा कर्ता कोण? जन्म-मृत्यू कोणाच्या आज्ञेनें घडून येतात, यासंबंधीं विचार व प्रश्न विचारवंतांचे मनांत सहजच उठले असले पाहिजेत. त्यांचे विचार, प्रश्न, शंका व शोध यांतूनच तत्त्वज्ञानाची निर्मिति झाली आहे. त्यांतूनच ईश्वर-परमेश्वर, प्रकृति-पुरुष, आत्मा-परमात्मा, ब्रह्म-परब्रह्म पूर्व-जन्म व पुनर्जन्म वगैरे कल्पना व विचार मनुष्याला सुचले आहेत.

## तत्त्वज्ञानांतील अंतिम विचारांचीं निरनिराळीं नांवें

प्रत्येक विचारकाची ज्ञानाविषयींची जिज्ञासा, उत्कंठा, तळमळ, त्याचें वैराग्य, सचेतन-अचेतन-सृष्टिविषयक त्याचें अवलोकन-निरीक्षण-परीक्षण, त्याची बौद्धिक सूक्ष्मता व व्यापकता व शेवटची बाब म्हणजे त्याची निर्णयशक्ति यांच्या प्रमाणानें त्याच्या शोधांत त्याला सिद्धि प्राप्त झाली असेल. त्यावरून त्यांनीं जन्म-मृत्यूंचे बाबतींतील, तसेंच एकंदर जगद्विषयक सिद्धान्त ठरविले. त्यांतच त्यांना तृप्ति, समाधान, प्रसन्नता व जीवनविषयक कृतार्थता वाटली असेल. पुढें वाढत्या अनुभवामुळें, ज्ञानामुळें, निरीक्षणामुळें व निर्णयशक्तीमुळें आपल्या पहिल्या समजुतींत व ज्ञानांत कालांतरानें कोणास शंका उत्पन्न होऊन तो नव्या शंकांसह पुनः शोधाचे मार्गे लागला असेल किंवा पुढील विचारकाला पहिले शोध व सिद्धान्त न पटल्यामुळें तो स्वतःच्या शंकासह अधिक सूक्ष्मपणें व व्यापकपणें त्याच शोधामागें लागला असेल. अशा रीतीनें सचेतन-अचेतन सर्व तत्त्वांचा पुनः पुनः शोध घेत घेत विश्वाच्या आदिकारणापर्यंत कोणा विचारकाच्या तर्काची मजल गेल्यावर,सर्वांचें आदिकारण असें एकच सनातन अविभाज्य तत्त्व सर्व विश्वांत भरलेलें आहे असें त्याला खात्रीपूर्वक वाटलें असेल व त्याची सूक्ष्मता, विशालता व व्यापकता यांवरून त्यालाच त्यानें ब्रह्मतत्त्व म्हटलें असेल व विश्वांतील सजीव-निर्जीव अणूंपासून ब्रह्मांडापर्यंत जें जें कांहीं दृश्य-अदृश्य, गोचर-अगोचर, ज्ञात-अज्ञात, कल्पनेंत येणारें-कल्पनेंत न येणारें, यच्चयावत् सर्व, तद्वतच आपण स्वतःसुद्धां हा सर्व, महान् व मूलभूत तत्त्वाचा आविर्भाव आहे, असा दृढ तर्क किंवा अनुमान त्याचे ठायीं बाणलें असेल तर त्या ज्ञानाला तो ब्रह्मज्ञान म्हणेल. विचारक ज्या तत्त्वाशीं स्थिरावला, पुढें विचार करण्याची त्याची गति जेथें बंद पडली, जेथें त्याची तळमळ शांत झाली, त्या तत्त्वाला किंवा तर्काला त्यानें प्रधान








अनुक्रमणिका

मानून त्या तत्त्वाचें बोधक नांव त्यानें आपल्या शेवटच्या निर्णयाला दिलें. सृष्टीच्या आदिकारणांत ज्याला नियामकपणा व शक्तिमत्त्व हीं प्रधानरूपें वाटलीं त्यानें त्याला ईश्वर हें नांव दिलें, ज्याला व्यापकपणा व अनंतत्व हीं प्रधानरूपें वाटलीं त्यानें त्यालाच ब्रह्म म्हटलें आणि स्वतःच्या ज्ञानाला ब्रह्मज्ञान मानलें. आपणहि त्याच विशाल तत्त्वाचा आविर्भाव आहों या विचारावर ज्याची मति दृढ होऊन राहिली, शरीरांतील मुख्य तत्त्व तेंच आहे असा निश्चय ज्याचे ठिकाणीं बाणला, त्यानें त्याला आत्मज्ञान म्हटलें. अत्यंत परिश्रमानें व सतत सूक्ष्म अवलोकन, अभ्यास वगैरेंच्या साहाय्यानें ज्यांनीं आपल्या शोधाच्या प्रयत्नांत कोणत्याहि रीतीनें यश मिळविलें असेल, ज्यांना जीवनांत सत्यज्ञानाच्या शोधाशिवाय दुसरा कोणताहि हेतु राहिलेला नसेल, जे वासना-तृप्त, भौतिक विषयांविषयीं अनासक्त, ज्ञानाकरितां अत्यंत व्याकुळ व समर्थ असूनहि विरक्त, त्यांना आपल्या शोधांत अखेर मिळालेल्या सफलतेनें किती आनंद, किती प्रसन्नता व कृतकृत्यता वाटली असेल, त्याची कल्पना आपणांसारख्यांस कशी होऊं शकणार? एकाच उच्च हेतूच्या मागें तन-मन-सर्वस्वानें लागल्यावर जीवनाचा तोच एकमात्र हेतु बनवून त्याकरितां अपार परिश्रम घेतल्यावर, त्यांतील सिद्धीनंतर त्यांना काय वाटलें असेल? जीवनाचें सार्थक झालें, जीवनांत कोणताहि हेतु उरला नाहीं, कोणतेंहि कार्य किंवा कर्तव्य यापुढें राहिलें नाहीं असें वाटून त्यास त्या स्थितींत परम आनंद झाला असल्यास त्यांत आश्चर्य काय? स्वतःमध्यें किंवा सृष्टीमध्यें अंतर्बाह्य जाणायचें आतां कांहीं राहिलें नाहीं असें वाटून त्यांस परम कृतार्थता वाटली असल्यास त्यांतहि आश्चर्य काय? ज्ञानानें परिपूर्ण झाल्यावर पुढें जीवनाची इच्छा नाहीं व मृत्यूचेंहि भय नाहीं, अशी त्यांची अवस्था झाली असल्यास त्यांत स्वाभाविकतेपेक्षां निराळें कांहीं नाहीं. कोणतेंहि बंधन नाहीं, कोणतीहि इच्छा नाहीं, अशा स्थितींत मोक्षाची कल्पना त्यांच्या मनांत आली असल्यास त्यांतहि सहजता आहे. सत्याचा शोध लागावा हा एकमात्र हेतु, त्याकरितां केलेले परिश्रम, चिंतन, मनन, निदिध्यास, विरक्त स्थिति, स्वार्थाचा परिपूर्ण अभाव, सर्व तत्त्वांचा लागलेला शोध, प्रयत्नांत आलेली यशस्विता, त्यामुळें लाभलेली ज्ञानावस्था वगैरे सर्वांचा तो स्वाभाविक परिणाम असावा याविषयीं शंका वाटत नाहीं. अशा रीतीनें एकापेक्षां एक अधिक प्रखर, सूक्ष्म व गाढ विचारवंत शोधकांनीं केलेल्या प्रयत्नांतून निर्माण झालेलें तत्त्वज्ञान आपल्या वांट्यास आलेलें आहे. ही सर्व त्या महाभागांची कमाई आहे.

## सांप्रदायिकतेची वाढ

परंतु तत्त्वांचा शोध लागल्यावर त्या बाबतींत त्यांनीं मांडलेली विचारसरणी केवळ मान्य केल्यानें आपल्यालाहि तसाच आनंद व प्रसन्नता वाटेल व आपणहि त्यांच्याप्रमाणें जन्ममरणांतून मुक्त होऊं अशी कल्पना आपल्याला कशी झाली? पण कशी झाली हें आपण शोधूं शकत नसलों तरी केव्हां तरी त्या विचारसरणीलाच ज्ञान समजून त्याचा मोक्षाशीं संबंध जोडून देण्याची विलक्षण चूक आपण केली आहे यांत मात्र शंका नाहीं; व एकदां संबंध जोडल्यावर त्यांतूनच ब्रह्मज्ञान, आत्मज्ञान, ब्रह्मसाक्षात्कार, आत्मसाक्षात्कार वगैरे कल्पना निर्माण झाल्या आहेत; व तत्त्वशोधक दार्शनिकांच्या आनंदावरून ब्रह्मानंद, आत्मानंद, नित्यानंद वगैरे निरनिराळे आनंद कल्पून आम्हीं आनंदाची उपासना चालू केली आहे. ज्ञान, आनंद, कृतार्थता, बंधनरहित अवस्था हे कशाचे परिणाम आहेत याचा विचार न करतां दार्शनिकांनीं व विचारवंतांनीं मांडलेली विचारसरणीच या सर्व गोष्टींचें साधन आहे असें आम्हीं मानलें. अनेक प्रकारचे परिश्रम सोसल्यावर, हेतु सिद्ध झाल्यावर व शोधकाची ज्ञानाची तळमळ शांत झाल्यावर त्याचे चित्ताची जी स्वाभाविक अवस्था झाली ती परिश्रम, तळमळ, प्रयत्न, त्यांतील शेवटचें यश व ज्ञान या सर्वांचा मिळून तो परिणाम होता, वगैरे गोष्टी लक्षांत न घेतां केवळ विचारसरणी, केवळ आनंदाची कल्पना यायोगें आम्हीं कृतार्थता मानूं लागलों व मोक्ष साधण्याचा प्रयत्न करूं लागलों. केव्हांतरी अशा प्रकारचा

भ्रामक विचार आमच्यांत निर्माण झाला व परंपरेनें तो दृढ होत जाऊन श्रद्धेचें स्वरूप धारण करून बसला.

अमेरिकेच्या प्रथम दर्शनाबरोबर कोलंबसाला अतिशय आनंद झाला व त्या भूमीवर पहिलें पाऊल ठेवतांना त्याला कृतार्थता वाटली. न्यूटनला त्याच्या शोधांत यश आल्यावर आनंद व धन्यता वाटली किंवा आजहि मोठमोठे शोधक व मोठमोठे वैज्ञानिक यांना आपआपल्या शोधांत व प्रयत्नांत यश आल्यावर आनंद व कृतार्थता वाटते. यावरून अमेरिकेच्या दर्शनांत व त्या भूमीवर पाऊल ठेवण्यांत आनंद व कृतार्थता वाटण्याचा गुण आहे किंवा न्यूटनचा सिद्धांत समजून घेण्यानें न्यूटनला मिळालेला आनंद प्राप्त होत असतो अथवा आजच्या शोधकांच्या शोधांची उपपत्ति समजून घेतल्यानें त्या शोधकांस होणारा आनंद व कृतार्थता आपल्यालाहि लाभतील असें मानून त्याप्रमाणें कोणी प्रयत्न करूं लागला तर तें योग्य होईल काय ? आपण तें सर्व योग्य मानूं काय ? ज्ञानाच्या इतर क्षेत्रांत आपण जें योग्य मानीत नाहीं तें तत्त्वज्ञानाच्या बाबतींत मात्र त्याला दिलेल्या आध्यात्मिक स्वरूपामुळें आपण योग्य मानीत आहों, त्यावर श्रद्धा ठेवीत आलों आहों व त्यावर आज मोठमोठे संप्रदाय चालत आहेत.

## मोक्ष—कल्पनेचा उसना आनंद

या सर्वांचा विचार करतां असे प्रश्न उत्पन्न होतात कीं ज्ञान कशाला म्हणावें ? आनंद व कृतार्थता यांचें स्वरूप काय ? हे भाव किंवा अवस्था कशांतून निर्माण होतात ? हे कशाचे परिणाम आहेत यांचा आपण सूक्ष्मपणें विचार केलेला नाहीं. आपण तत्त्वशोधक नाहीं. आपल्याला शोधाची, जिज्ञासेची तळमळ नाहीं. आपल्याला आनंदाची इच्छा आहे. मोक्षाचीहि इच्छा कोणास असेल; परंतु मूळ शोधकास झालेल्या आनंदाची किंवा कृतार्थतेची आपल्याला इच्छा नाहीं. तरी शोधकाचा शोध जेथें संपला व तो संपल्यावर त्याला जी वस्तु निर्णय म्हणून सांपडली, तो निर्णय आपल्या चित्तावर अनेक रीतींनीं ठसविण्यानें आपण जन्ममरणांतून मुक्त होऊं असें आपण मानीत आलों आहों. तो निर्णय चित्तावर ठसविणें हें साध्य व त्याची बनवलेली विचारसरणी हें साधन मानून तीच निरनिराळ्या रूपकांनीं, आलंकारिक भाषेनें व विद्वत्ताप्रचुर तर्कवादानें मांडून, ग्रंथ लिहून आणि काव्यें करून आम्हीं स्वतःवर व इतरांवरहि ठसवूं लागलों. हा हिप्नॉटिझमचा प्रकार आहे; पण हें ज्ञान नाहीं. त्यांत कृतार्थता नाहीं, त्याच त्या कल्पना निरनिराळ्या रीतींनीं रंगवून आम्ही स्वतः कल्पनांत रंगत राहिलों व इतरांसहि रंगवूं व रमवूं लागलों. यांत आम्हांला आनंद मिळत नाहीं असें नाहीं; आनंद मिळतो, परंतु तो शोधानंतर झालेल्या ज्ञानाचा नसून आम्हींच आपल्या चित्तावर ठसविलेल्या कल्पनांचा, आम्ही स्वतःवर कांहीं दिव्य अगर अमर ठसवीत राहिल्याचा व आनंदाची धारणा धरून निर्माण केलेला तो आनंद असतो. प्रत्यक्ष शोधापासून होणाऱ्या ज्ञानाचा आनंद व शोधांतील विचारसरणीपासून व आनंदाची धारणा धरल्यामुळें वाटणारा आनंद यांत किती तरी फरक आहे ! आपल्या तत्त्वज्ञानाच्या बाबतींत असाच कांहीं प्रकार झाला असावा अशी प्रबळ शंका वाटते. जीवनाचें आपलें ध्येय मोक्ष आहे, तत्त्वज्ञान्यांना मोक्ष मिळतो, अर्थात् तत्त्वज्ञान्याचें ज्ञान आपण मानलें, तें आपल्या चित्तावर ठसविलें कीं, आपल्यालाहि मोक्ष मिळणार अशी आपली कल्पना होते व ती कल्पना दृढ झाली कीं मोक्षाची खात्री वाटते. या क्रमानें आपल्यांत एक प्रकारची जी श्रद्धा निर्माण झाली ती परंपरेनें आज इतकी दृढ होऊन गेली आहे कीं मी ज्या दृष्टीनें हें लिहीत आहे त्या दृष्टीनें या बाबतींत विचार करण्यास क्वचितच कोणी तयार होईल.

## सांप्रदायिक हा शोधक नव्हे, केवळ श्रद्धाळु

तत्त्वज्ञानाच्या अनेक निरनिराळ्या प्रणाली आहेत. त्या सर्वांत एकवाक्यता आहे, असेंहि नाहीं; अखेरच्या सिद्धान्तांत तर प्रत्येकींत परस्पर विरोधहि सांपडेल; तरी जो ज्या मताला एकदां अनुसरतो तो त्या मताला इतका चिकटून बसतो








कीं, त्याला कितीहि समजावलें तरी तो आपली विचारसरणी सोडीत नाहीं! कारण तो शोधक नसून श्रद्धाळु असतो आणि आपल्या तत्त्वज्ञानांत भूल आहे असें मानल्यास किंवा ठरल्यास आपलें तत्त्वज्ञान अपूर्ण ठरणार व त्यामुळें आपल्या मोक्षांत व सद्‌गतींत व्यत्यय येणार, इतकेंच नव्हे तर ज्या संप्रदायाचे आपण आहों त्याला व त्याच्या मूळ प्रवर्तकाला कमीपणा येणार, त्यायोगें त्या मूळ प्रवर्तकाच्या दिव्यपणाविषयीं किंवा अवतारीपणाविषयीं शंका उत्पन्न होऊन त्याच्यावरील श्रद्धा कमी होणार व तो आणि त्याच्या परंपरेंतील सर्व सांप्रदायिक अज्ञानी ठरणार, वगैरे वगैरे अनेक प्रकारचें भय व शंका यांमुळें आध्यात्मिक दृष्टीनें सर्वश्रेष्ठ मानलेलें तत्त्वज्ञान तपासून पाहण्याला तो तयारच होत नाहीं. अशा प्रकारचे श्रद्धाळु केवळ सांप्रदायिक लोकांतच असतात असें नाहीं. कोणताहि संप्रदाय स्वीकारला नसला तरी आध्यात्मिक हेतूकरितां तत्त्वज्ञान मानणाऱ्या लोकांपैकीं बहुतेकजण कोणातरी पूर्व महापुरुषाच्या दृष्टीनेंच तत्त्वज्ञानाचा विचार करणारे असतात. सांप्रदायिक किंवा बिनसांप्रदायिक यांत कोणी अभ्यासी नसतात, असें नाहीं. परंतु त्यांचें अभ्यासाचें धोरण ठरलेलें असतें. तें आपल्या मूळ श्रद्धेला संभाळून अभ्यासी असतात. म्हणून त्यांच्यांत शोधकवृत्ति नसते. जे खरोखरच शोधक असतात ते केवळ श्रद्धेनें कोणतीहि गोष्ट मानावयाला तयार नसतात. ते प्रत्येक गोष्टीला अनुभवसिद्ध करण्याच्या प्रयत्नांत असतात. जितक्या शंका व तर्क उठतील त्या सर्वांचें निरसन करून त्यांना सत्य ज्ञान मिळवावयाचें असतें. म्हणून ते शंका, तर्क वगैरेंना भीत नाहींत. परंतु ज्यांच्या तत्त्वज्ञानावरील श्रद्धेच्या मागें मोक्षाची आशा असते ते, भाविकभक्त जसा आपल्या पूज्य मूर्तीला जपतो व संभाळतो त्याप्रमाणें, आपल्या तत्त्वज्ञानाला जपत व संभाळीत असतात. तो ज्याप्रमाणें आपल्या मूर्तीला निरनिराळ्या रीतींनीं शृंगारून–शोभवून स्वतःमध्यें आनंद निर्माण करण्याचा प्रयत्न करतो, त्याप्रमाणें हे तत्त्वज्ञानीहि आपल्या मानलेल्या तत्त्वज्ञानाला निरनिराळ्या रूपकांनीं व आलंकारिक भाषेनें रसप्रद करून आनंद निर्माण करीत असतात व त्या आनंदावरून आत्मा, ब्रह्म, आनंदरूप आहे वगैरे वगैरे वर्णन करतात.

## केवळ श्रध्दाळूपणानें तत्त्वज्ञानाचा विकास खुंटतो

खरोखर पाहतां तत्त्वज्ञान हा विषय शोधाचा आहे. त्याला रूपक, काव्य, अलंकार, शोभा, रंग, रस यांची आवश्यकता नाहीं. सत्यशोधन हा त्यांतील मुख्य हेतु आहे. त्यांत आनंद आहे तो सत्यज्ञानाचा आहे. त्या सत्याला, त्या ज्ञानाला शब्दांनीं समजावें लागत नाहीं किंवा उपमा अलंकार यांनीं त्याला गोडी आणावी लागत नाहीं. ज्ञानापासून आनंद होण्यास प्रथम ज्ञानाची तळमळ असावी लागते. तें मिळविण्याकरितां परिश्रम करावे लागतात. जीवनाचा तोच एक हेतु ठेवून व सर्वस्वाचा त्याग करून त्याचे मागें लागावें लागतें. प्रखर बुद्धीची, अत्यंत चिकाटीची या मार्गांत जरूर असते. इतकें असूनहि सत्याची पारख तद्गतच निर्णयशक्ति असावी लागते. या गोष्टी ज्या मानानें आपल्यांत असतील त्या मानानें आपल्याला ज्ञानापासून आनंद होणारा आहे. –वेदान्ताची किंवा दुसरी कोणतीहि विचारसरणि केवळ मानल्यानें, विश्वाच्या उभारणीचा व संहारणीचा उलट सुलट--क्रम ग्रंथांतून समजून घेतल्यानें, पंचीकरणपद्धतीनें वरून पंचमहाभूतांची निरनिराळ्या पद्धतीची वांटणी समजल्यानें व शेवटीं 'आत्मा' किंवा 'ब्रह्म' मीच आहे अशी धारणा चित्तावर सदैव ठसवीत राहिल्यानें तो आनंद–शोधाचे शेवटीं यशस्वितेनंतर वाटणारा आनंद–आपल्याला मिळूं शकणार नाहीं. मोक्षाचे आशेनें 'मी कोण आहें?' याचा तपास काढण्याचा प्रयत्न करणारा श्रद्धाळु वर लिहिलेल्या विचारसरणीनें आपल्या मनाला समजावीत व मानवीत शेवटीं "मीच आत्मा, मीच ब्रह्म आहें, बाकी सर्व कारभार–शरीर, मन, बुद्धि, प्राण वगैरे सर्व प्रकृतीचा खेळ आहे" या समजुतीवर येऊन 'अहं ब्रह्मास्मि' या महावाक्यावर चित्तवृत्ति दृढ करण्याचा प्रयत्न करतो व सतत अभ्यासानें ती

वृत्ति इतकी दृढ होऊन जाते कीं तोच सत्याचा अनुभव व तोच आत्मबोध अशी त्याची मति होऊन जाते; परंतु त्याच्या ध्यानांत येत नाहीं कीं हा आत्मबोध नसून वेदान्त-प्रणालीवरून आपण स्वतःची बनवलेली ती एक चित्तवृत्ति आहे. जन्ममृत्यूंच्या भयानें, 'मी कोण ?' याचा तपास लागला पाहिजे या तळमळीनें व साधक दशेंतील वैराग्यनिष्ठेनें त्याच्यांत कांहीं संयम व सद्गुण आलेले असतात व पुढें तत्त्वज्ञानांतील एक सिद्धान्त पकडून 'तोच मी' अशी समजूत दृढ करून घेतल्यानें त्याच्या चित्ताची तळमळ शांत झालेली असते. अशा स्थितींत श्रद्धाळु अभ्यासकाला आपल्याला आत्मसाक्षात्कार झाला, अशा समजुतीनें समाधान वाटूं लागतें व लोकांसहि तसेंच वाटावें असें त्याला वाटतें आणि पुढें मोक्षाची तर त्याला खात्रीच असते. हा सर्व प्रकार तत्त्वज्ञानाचा मोक्षाशीं संबंध मानल्यानेंच बनत असतो यांत संशय नाहीं. श्रद्धेनें कोणतें तरी तत्त्वज्ञान स्वीकारलें त्यांतील 'आत्मा व ब्रह्म'विषयक मान्यता अंगीकारिली व 'तोच आत्मा—ब्रह्म मी' अशी दृढवृत्ति बाणवतां आली कीं आपण मुक्त होतों अशी आपली श्रद्धा. या चुकीच्या श्रद्धेमुळें तत्त्वज्ञानाचा विकास अटकून गेला. तत्त्वज्ञान व मोक्ष यांचा संबंध जेव्हां तुटेल किंवा आपल्या ध्येयविषयक कल्पना जेव्हां बदलतील तेव्हांच आपण या विषयांत अधिक चिकित्सक व शोधक होऊं व तेव्हांच तत्त्वज्ञान विकसित होऊं लागेल व चालू जीवनांत आपल्याला त्याचा उपयोग होऊन आपलें जीवन समृद्ध व सफल होऊं शकेल.

## आत्मज्ञान हा मानीव श्रद्धेचा प्रकार

तत्त्वज्ञान हा शोधाचा विषय आहे असें समजून आम्ही तत्त्वांचे शोधक व अभ्यासी होऊं तर पंचभूतात्मक सृष्टींतील सर्व स्थूल—सूक्ष्म पदार्थांचें व त्यांच्या गुणधर्मांचें ज्ञान आपल्याला झाल्याशिवाय राहणार नाहीं; ध्वनि, प्रकाश, विद्युत् यांसारख्या गूढ व महान् तत्त्वांच्या कार्यकारणभावांचें ज्ञान आपल्याला होईल; मनुष्य व इतर प्राणी यांचे गुणधर्म, संस्कार, स्वभाव वगैरेंचेंहि ज्ञान आपल्याला होईल; मन, बुद्धि, चित्त, प्राण, चैतन्य या सर्वांविषयीं सूक्ष्मातिसूक्ष्म ज्ञान आपल्यापुढें प्रकट होईल व आपण सर्व चराचर सृष्टीचे व त्यांतील सूक्ष्म तत्त्वांचे ज्ञाते होऊं. अशा रीतीनें सर्व तत्त्वांचा शोध घेत घेत जर आपण तत्त्वज्ञानाच्या अंतापर्यंत पोहोंचूं तर या विश्वांत आपल्याला अज्ञात असें कांहीं राहणार नाहीं आणि मग त्या सर्व ज्ञानाचा उपयोग मानवजातीचा उत्कर्ष व कल्याण यांकडे करण्यांचेंहि आपल्याला सहज साधूं शकेल. त्या ज्ञानानें भूतमात्राचें हित साधण्याकडे आपल्या जीवनाचें सहज धोरण राहील. परंतु यांपैकीं कोणत्याच तत्त्वाचा—ज्ञानाचा शोध आपल्याला लागला नसतां व मानवजातीचें कल्याण आणि भूतमात्राचें हित यांपैकीं कोणतीहि गोष्ट आपल्याला साधत नसतां केवळ आत्मतत्त्वाचें ज्ञान होऊन आपल्याला ब्रह्मसाक्षात्कार होऊं शकतो ही गोष्ट ज्ञानमार्गानें संभवनीय वाटत नाहीं. सत्यदृष्टीनें तपासतां हा प्रकार मानीव श्रद्धेचा ठरेल. त्याला ज्ञानाची सिद्धि म्हणतां येणार नाहीं.

## भ्रामक वृत्तीचें तत्त्वज्ञानाच्या नांवानें पोषण

पण आमच्यांत शोधकपणा नसतां आम्ही स्वतःस तत्त्वज्ञानी मानूं लागलों; जन्ममरणाच्या भयानें मोक्षाची खात्री वाटण्याकरितां किंवा आध्यात्मिक ज्ञानांतील सर्वोच्च महत्त्वाकांक्षेनें आम्ही कोणतें तरी तत्त्वज्ञान मानीत राहिलों. त्यायोगें आमच्यांत शोधकपणा न येतां केवळ श्रद्धाळूपणा किंवा सांप्रदायिक अगर वैयक्तिक दुराग्रह वाढत गेला. कोणत्या तरी तत्त्वज्ञानाचा शेवटचा सिद्धान्त मनावर ठसविण्याकरितां आम्ही त्याचें वाचन, मनन, चिंतन करीत राहिलों. तोच दृढ करण्याकरितां त्याचाच जप करीत तो घोकीत राहिलों. तो मनावर दृढपणें ठसला कीं जन्ममरणांतून मुक्ति लाभेल असें आम्हीं मानलें. त्या स्थितींतच आध्यात्मिक महत्त्वाकांक्षेची पूर्ति मानून जीवनांत जें अखेर साधावयाचें तें साधलें अशा समाधानांत आम्ही राहिलों. जणूं काय ही गोष्ट साधली कीं जीवनांत आणखी कांहीं

जाणावयाचें, करावयाचें उरलेंच नाहीं, अशा भ्रामक समजुतीमुळें आम्ही मानलेल्या श्रेष्ठ सिद्धांताला निरनिराळ्या रूपकांनीं शोभवून आम्ही स्वतःला मनोमय रमवूं लागलों, त्यांतूनच निरनिराळे रस उत्पन्न करून आनंद घेऊं लागलों व आमच्याभोंवतीं जमणाऱ्या भाविकांच्या मनांत तसल्याच आनंदाची इच्छा उत्पन्न करूं लागलों. भूतकाळांत अध्यात्ममार्गांत श्रेष्ठ ठरलेल्या विभूती किंवा अवतारी मानलेले पुरुष आपणच आहों असें कल्पून व मानून आम्ही आपल्या अंगांत मस्तीचा व श्रेष्ठतेचा आव आणूं लागलों. एवंच, आम्ही स्वतःमधील भ्रामक वृत्तींचेंच तत्त्वज्ञानाच्या नांवानें पोषण करूं लागलों व त्याकरितां त्यांतून मार्ग काढूं लागलों. आपल्यांत शोधकपणा असता तर असले भ्रामक प्रकार तत्त्वज्ञानाच्या नांवावर न होतां आपल्याकडून त्या शास्त्राचा विकास झाला असता व त्यायोगें आपल्याला अनेक भौतिक व सात्त्विक लाभ होऊन आपण उन्नत झालों असतों; परंतु तत्त्वज्ञानाचा संबंध मोक्षाशीं जोडला गेल्यामुळें तसा लाभ होऊं शकला नाहीं. प्रत्येक संप्रदायानें कोणतें ना कोणतें तत्त्वज्ञान मानून त्याची विचारसरणि अंगिकारली आहे. याचें कारण हेंच कीं, तत्त्वज्ञानाशिवाय मोक्ष नाहीं, अशी आपल्यांतील महापुरुषांची व सर्वसाधारण लोकांची चालत आलेली परंपरागत श्रद्धा आहे व म्हणूनच या मार्गांत ज्ञानाचा विकास न होतां केवळ श्रद्धाळूपणा वाढत गेला आहे.

## तत्त्वज्ञान हें जीवनाच्या शुद्धीकरतां व सिद्धीकरतां

या सर्वांवरून विचार करतां तत्त्वज्ञानाचा संबंध आपण मोक्षाशीं न मानतां आपल्या जीवन-शुद्धीशीं व जीवन-सिद्धीशीं जोडला पाहिजे. मानव्याला आवश्यक असलेल्या प्रत्येक गोष्टीला अधिक शुद्ध, अधिक तेजस्वी व अधिक प्रभावी करण्याचें सामर्थ्य तत्त्वज्ञानांत असलें पाहिजे. मानवी जीवनांत धर्म, अर्थ व काम हे तीन मोठे पुरुषार्थ आहेत. मनुष्यमात्राचें सर्व जीवन या तीन पुरुषार्थांत वांटलें गेलें आहे. या तिहींच्या शुध्दीनेंच जीवनशुध्दि व जीवनसिध्दि साधणार आहे. ज्ञानाशिवाय शुध्दि व सिध्दि साधणें शक्य नाहीं. म्हणून धर्म, अर्थ व काम यांना शुध्द करण्याचें सामर्थ्य ज्ञानांत असलें पाहिजे. व्यक्ति व समष्टि यांचें कल्याण परस्परांस विरोधक वा विघातक न होतां तें परस्परांस सहायक होत राहील या दृष्टीनें धर्म, अर्थ व काम, यांचा विचार होण्याकरितां तत्त्वज्ञानाची खास आवश्यकता आहे. ती आवश्यकता पुरी करण्याची शक्ति तत्त्वज्ञानांत असली तरच धर्म, अर्थ व काम यांची शुध्दि होऊन मानवधर्मांची सिध्दि प्राप्त होणार आहे. ज्याला आपण तत्त्वज्ञान म्हणून मानतों त्यांत ही शक्ति नसेल तर त्याच तत्त्वज्ञानाला विकसित करून आपण त्यांत ती शक्ति आणली पाहिजे. ज्ञानांत जर कर्तृत्व नसेल वा शक्ति निर्माण करण्याचा गुण नसेल तर त्य ज्ञानांत व अज्ञानांत कांहींच फरक नाहीं. दीपकांत व अग्नींत प्रकाश देण्याची शक्ति असणारच. ती शक्ति दीपकांत व अग्नींत नाहीं असें प्रत्ययास येत असेल तर तेथें दीपक व अग्नि नसून त्याविषयीं कांहीं भ्रांतीच असली पाहिजे असें निःशंकपणें समजण्यास हरकत नाहीं.

सारांश, आपण तत्त्वज्ञानाच्या आभासावर विश्वासून न राहतां, मानवी जीवन सर्व बाजूंनीं सफल करण्याचें सामर्थ्य ज्यामध्यें असेल अशा तत्त्वज्ञानाचा आश्रय केला पाहिजे. भ्रमामागें न लागतां आपण खरोखरच ज्ञानाची प्राप्ति करून घेतली तर त्याच्या मागोमाग आपल्यांत कर्तृत्व आलेंच पाहिजे. ज्ञानाच्या प्राप्तीनंतर त्याचा उपयोग करणें हा त्या ज्ञानाचा स्वाभाविक परिणामच आहे.



अनुक्रमणिका






# सुमित्रानंदन पंत

## श्री. दि. के. बेडेकर

[ सुमित्रानंदन पंत यांना आजच्या हिंदी कवींमध्यें मोठें व वैशिष्ट्यपूर्ण स्थान आहे. वेदान्त, योग इत्यादि भारतीय दर्शनांनीं या कवीच्या मनाची घडण बनविली आहे; पण त्यांनीं मार्क्सवादाचाहि अंगीकार केला आहे. या कवीच्या काव्यासंबंधीं पुढील परिचयात्मक विवेचन लेखकानें केलें आहे. —का. संपादक. ]

सन १९४१ मध्यें माझी व श्री. नरेंद्र शर्मा यांची देवळीच्या राजबंदी–कॅम्पमध्यें गांठ पडली. शर्माजी स्वतः एक प्रसिद्ध कवि असून सुमित्रानंदन पंत यांचे परममित्र आहेत. साहजिकच हिंदी काव्या-संबंधीं व पंतजींच्या एकंदर तत्त्वज्ञानाविषयीं आमची चर्चा सुरू झाली व बंदिवासाच्या काळांत मला पंत–काव्याचा नीट अभ्यास करतां आला.

त्या अभ्यासामुळें पंतजींच्या श्रेष्ठ काव्यप्रतिभेचा अनुभव तर मला आलाच, पण शिवाय मला असेंहि आढळून आलें कीं या कवीच्या काव्यांत ओतप्रोत भरलेली अशी एक निष्ठा आहे. त्या निष्ठेला नांव काय द्यावयाचें ? बहुजनसमाजाच्या मुक्तीची, सुखाची व सर्वोदयाची तळमळ हें त्या निष्ठेचें एक रूप सांगतां येईल; तसेंच, सत्यसंशोधनाची निरलस व प्रांजल वृत्ति हेंहि त्या निष्ठेचेंच दुसरें रूप आहे, असें दिसेल. आपल्या-कडील आधुनिक कवींप्रमाणें शेली, कीट्स प्रभृतींचा प्रभाव या कवीच्या मनावरहि आहे; परंतु जास्त निकटचा व सखोल प्रभाव टागोरांचा आहे. असें असूनहि टागोरांना सोडून आजच्या "परिवर्तन-काळांतल्या विक्षुब्ध" कवींची भूमिका पंतजींनीं अंगीकारिली आहे. जनगणमनांपर्यंत पोंचणें हा काव्याचा स्वभाव असला पाहिजे अशी पंतजींची निष्ठा आहे व म्हणून ते म्हणतात :

'तुम वहन कर सको जनमन में मेरे विचार  
वाणी मेरी, चाहिए तुम्हें क्या अलंकार'

एकीकडे, लोकजीवनाकडे इतकें ओढलें गेलेलें पंतजींचें मन दुसरीकडे सृष्टिसौंदर्यांतहि तितक्याच एकतानतेनें समरस होऊं शकतें आणि त्यांच्या या सौंदर्यनिष्ठेंतहि एक खंबीर निकोप सरलता व आशावाद आहे.

पंतजींच्या काव्यामागें जी व्यापक निष्ठा आहे, तिचें पुसट स्वरूप मीं वर दर्शविलें आहेच. या निष्ठेमुळेंच हिंदी काव्यांत पंतजींना आज एक महत्त्वाचें स्थान आहे आणि नरेन्द्रांसारखे तरुण कवि आज त्यांच्या "संप्रदायांत" जमा होत आहे, ( पंतजींच्या स्वभावांत मात्र कोठल्याहि 'संप्रदाय–प्रमुखा'च्या अंगीं असणारे गुण व 'कळा' नाहींत, त्यामुळें त्यांच्या नांवाचा असा संप्रदाय उत्पन्न झालेला नाहीं. ) पंतजींच्या काव्याचें व त्याच्यामागील तत्त्वभूमिकेचें कांहीं विवेचन मी या लेखांत करणार आहे.*

---

* पंतजींसंबंधीं माझा विस्तृत निबंध, नरेंद्र शर्मा यांच्या प्रस्तावनेसह, लहान पुस्तिकेच्या रूपानें नुकताच प्रसिद्ध झाला आहे.—लेखक.








# सुमित्रानंदन पंत

## कूर्माचलाचा कवि

सदर विवेचनापूर्वी पंतजींसंबंधीं कांहीं खासगी माहिती देतों. त्यांचा जन्म, १९०० सालीं, 'कूर्माचल' या प्राचीन नांवानें प्रसिद्ध असलेल्या सध्यांच्या अलमोडा प्रांतांत झाला. हा प्रांत हिमालयाच्या कुशींत असल्यासारखा आहे व तेथें साहजिकच सौंदर्याचा वरदहस्तच आहे. हिंवाळ्यांत सारें बर्फमय होऊन अद्भुतरम्य व शांत वातावरणाचा अनुभव येथें येतो. पावसाळ्यांत कूर्माचल–सृष्टीचें वर्णन पंतजींनीं असें केलें आहे:—

"पावस ऋतुथी, पर्वतप्रदेश
पलपल परिवर्तित प्रकृति वेष
मेखलाकार पर्वत अपार
अपने सहस्र दृक्–सुमन फाड
अवलोक रहा है बार बार
नीचे जलमें निज महाकार"

अशा या सुंदर प्रदेशांत कवीचा जन्म झाला आहे. तसेंच त्यांच्या प्रतिभेची प्रथम प्रेरणा या सुंदरतेंतच आहे असें खुद्द त्यांच्याच उद्गारांवरूनहि दिसतें. ते म्हणतात, "कविता करने की प्रेरणा मुझे सब से पहले प्रकृतिनिरीक्षणसे मिली है, जिसका श्रेय मेरी जन्मभूमि कूर्माचल प्रदेशको है."

पंतजींनीं सन १९२०पर्यंत विद्यालयीन शिक्षण घेतलें व त्या वर्षी असहकारितेच्या लाटेंत या शिक्षणाला कायमचा रामराम ठोकला. ती लाट ओसरल्यानंतर त्यांनीं राजकीय जीवनांत मात्र पुनः पाऊल ठेवलें नाहीं. तेव्हांपासून त्यांनीं एकनिष्ठपणें काव्यसाधना चालविली आहे. घरची सुखवस्तु स्थिति असल्यामुळें व संसाराचा पाश नसल्यामुळें त्यांना पोटासाठीं खडण्याची पाळी कधीं आली नाहीं.

## तत्त्वज्ञानाचा अभ्यासक

त्यांनीं काव्यसाधनेंत अखंड मग्न असतांना भारतीय व युरोपीय तत्त्वज्ञानांचा अभ्यास केला आहे. प्रकृतीला अखंड परिवर्तनशील मानणारें भारतीय तत्त्वज्ञान आणि विश्वाला स्वयंगतिमान् व विकासशील मानणारे बर्गसाँ, मार्क्स प्रभृति युरोपीय तत्त्वज्ञ यांच्या कल्पनांचा समन्वय त्यांनीं आपल्या मनांत साधला आहे. या बाबतींत ते टागोरांचे शिष्य आहेत. प्राचीन–अर्वाचीन, पौर्वात्य–पाश्चिमात्य इत्यादि विभिन्न विश्व–कल्पनांचा वास्तविक व इतिहाससिद्ध परस्परसंबंध न पाहतां या सर्वांतून कांहीं तरी एक सत्य किंवा सार काढतां येतें काय हें पाहण्याकडे टागोरकालीन भारतीय विद्वानांचा कल होता. तीच दृष्टि पंतजींनींहि ठेवलेली आढळते. एके ठिकाणीं ते म्हणतात, "ऐतिहासिक भौतिकवाद और भारतीय अध्यात्मदर्शनमें मुझे किसी प्रकार का विरोध नहीं जान पडा, क्यों कि मैंने दोनों का लोकोत्तर कल्याणकारी सांस्कृतिक पक्षही ग्रहण किया. ......मानवता एवं सर्वभूतहितकी जितनी विशद भावना मुझे वेदान्तमें मिली उतनी ही ऐतिहासिक दर्शनमें भी."

## प्रारंभकालीन निसर्गकाव्य

वरील उताऱ्यावरून पंतजींच्या तात्त्विक भूमिकेचा मध्यबिंदु कोणता हें ठरवितां येईल. 'मानवता' किंवा ज्याला ह्यूमॅनिझमचें तत्त्वज्ञान म्हणतां येईल तोच पंतजींच्या तत्त्वज्ञानाचा व काव्याचा प्राण आहे. परंतु मानवधर्माची ही परिणत दृष्टि त्यांना अचानक लाभलेली नाहीं. उलट असें दिसेल कीं, पंतजींच्या काव्यांतील प्राथमिक कालखंडांत मानवतेकडे कवीचें लक्ष वळलेलें नव्हतें. "वीणा" (१९१८) या पहिल्या काव्यसंग्रहापासून "पल्लव" (१९२६) या संग्रहापर्यंतच्या त्यांच्या काव्याची प्रेरणा 'मानव' नसून 'निसर्ग' होती. सन १९१८-मध्यें लिहिलेल्या 'मोह' या कवितेंत कवीनें म्हटलें आहे:—

"छोड द्रुमोंकी मृदु छाया
तोड प्रकृतिसे भी माया
बाले! तेरे बाल–जालमें कैसे उलझा दूँ लोचन?"

त्या कालांतील पंत–काव्यामध्यें बालकवींच्या रम्य निसर्गवर्णनांची सहज आठवण करून देणारीं अनेक कवनें आहेत. एके ठिकाणीं ते म्हणतात, "उस फैली हरियालीमें, कौन अकेली खेल रही?" बालकवींच्या फुलराणीची आठवण करून देणाऱ्या या ओळींत बालकवींचीच सहजवृत्ति व निसर्गाशीं तद्रूपता आहे. पण 'पल्लव' (सन १९२६) पासून "गुंजन"-

( सन १९३२ )पर्यंतच्या काळामध्यें पंतजींच्या या अव्याज बालसदृश वृत्तींत परिवर्तन होत गेलें. पंतजींच्या शब्दांत सांगावयाचें तर सन १९३२पर्यंत " मेरा किशोरभावनाका सौंदर्यस्वप्न टूट गया. "

## सामाजिक संघर्षाचा संस्कार

" किशोरभावनाका सौंदर्यस्वप्न " संपून पंतजींची प्रतिभा प्रगल्भ अवस्थेस पोंचली याचें कारण स्वतः पंतजी असें देतात कीं, " दर्शनशास्त्र और उपनिषदोंके अध्ययनने मेरे रामतत्त्वमें मंथन पैदा कर दिया और उसके प्रवाहकी दिशा बदल दी. " हें कारण तर आहेच, शिवाय दुसरा एक बाह्य संस्कार कवीच्या मनावर झालेला आहे व तो म्हणजे सन १९३०–३२ या काळांतील सामाजिक व राजकीय उलथापालथीचा. सन १९३२च्या सुमारास संयुक्त प्रांतांतील राष्ट्रीय चळवळीचाच एक भाग म्हणून शेतकऱ्यांचा जमीनदारीविरोधी संघर्षहि उग्र रूप घेत होता. त्याच काळांत आर्थिक मंदीमुळें तेथील सुशिक्षितांचें आर्थिक, कौटुंबिक व नैतिक जीवनहि झंझावातांत सांपडल्यासारखें झालें होतें. राजकीय व वर्गीय संघर्षामुळें समाजाचें खरें स्वरूप उघड दिसूं लागलें होतें. ' बळी तो कान पिळी ' हा समाजाचा न्याय व आदर्श आहे हें दिसल्यामुळें पंतजींचें सौंदर्यस्वप्न भंगलें व त्यांची दृष्टि लोकाभिमुख ( बहिर्मुख ) झाली. " अपने युगमें बरते जानेवाले आदर्शों के प्रति मेरा हृदय विश्वास खो बैठा " असें सांगून पंतजींनीं या वेळच्या आपल्या मनःस्थितीचें वर्णन केलें आहे.

सन १९३२मध्यें पंतकाव्यामध्यें झालेलें हें परिवर्तन अत्यंत मूलभूत होतें. निसर्गाकडून मानवतेकडे पंतजी वळले व लक्ष्य बदलतांच काव्याचा साजहि बदलला. ' गुंजन ' या संग्रहापर्यंत अलंकाराचा व तंत्राचा भाग पंतकाव्यांत फार मोठा आहे व भाषाहि आलंकारिक व संकेतांनीं भारावलेली आहे. त्यानंतरच्या काव्यांत अर्थपूर्णतेकडे व तात्त्विकतेकडे पंतजींची भाषा झुकली असून " युगवाणी " व " ग्राम्या " या अलीकडच्या संग्रहांत भाषेचा साधेपणा तसाच चित्रणाचा स्पष्टपणा दिसून येतो. या परिवर्तन--कालामध्यें हिंदी कवींपैकीं बऱ्याच कवींनीं ' छायावादी ' काव्य लिहिलें; पण पंतजी मात्र त्या प्रवृत्तीपासून अलिप्त राहिले हें माझ्या मतें त्यांचें वैशिष्ट्य आहे. ' छायावाद ' ही हिंदी काव्यांतलि प्रवृत्ति ' द्विवेदी '–युगांतल्या सनातनीपणाशीं बंडखोरी करून निघालेली व युरोपीय काव्यादर्शांनीं पोसलेली " रोमॅन्टिक " प्रवृत्ति होती. पण या ' बंडखोर ' प्रवृत्तीच्या कवींना सन १९३०–३२नंतरच्या सामाजिक उलथापालथीचा व संघर्षाचा .आशय कळेनासा झाला. उमर खय्यामच्या धर्तीवर " मधु–संप्रदायी " काव्य निर्माण करून या नव्या संघर्षमय कालखंडांतील मनाला तृप्त करणें शक्य नव्हतें, त्यामुळें "वह ( छायावाद ) निगूढ, रहस्यात्मक, भावप्रधान और वैयक्तिक हो गया. "

## जीवनावरील अंतर्विश्वास

छायावादी हिंदी काव्यामध्यें " ऱ्हासयुगके वैयक्तिक अनुभव " आणि " ऊर्ध्वमुखी विकासकी प्रवृत्तियाँ " प्रकट होत असतांना पंतजींनीं आपली नाव वेगळ्या दिशेनें हांकारली. एकाकीपणानें हा मार्ग चोखाळण्याचें धैर्य त्यांच्यांत कोठून आलें ? याचें उत्तर ते स्वतः असें देतात कीं माझ्या मनांत " जीवनके प्रति एक अंतर्विश्वास है. " त्यांच्या या उत्तरांतील आशय दोनतीन तऱ्हांनीं स्पष्ट करणें शक्य आहे असें मला वाटतें व तसें करतांनाच त्यांच्या व्यक्तित्वाचें वैशिष्ट्यहि थोडेंफार रेखाटतां येईल.

जीवनावरील अंतर्विश्वासाची ही पंतजींची भूमिका एका दृष्टीनें त्यांच्या स्वभावांतच अंगभूत आहे. निसर्गपूजनाचें काव्य रचीत असतांना ओंगळ, क्रूर अशा सृष्ट वस्तूंकडे पंतजी कधीं आकर्षित झालेले दिसत नाहींत. उदाहरणार्थ, मृत्यूची कल्पना घ्या; ती त्यांना जवळ करावीशी वाटत नाहीं व त्यामुळें प्रेम व सौंदर्य यांचें प्रतीक बनलेल्या ताज–महालाकडे पाहून त्यांना रूढ विचार न सुचतां ते म्हणतात,

" हाय ! मृत्युका ऐसा अमर अपार्थिव पूजन !<br>
......................................................<br>
मानव ! ऐसी भी विरक्ति क्या जीवनके प्रति ?<br>
आत्माका अपमान, प्रेत और छायासे रति !! "








# सुमित्रानंदन पंत

निसर्गसौंदर्याशीं तद्रूप होण्याच्या बाबतींत मीं बालकवींचें नातें पंतजींशीं जोडलें होतें खरें; परंतु दोघांमधील एक मूलभूत फरक येथें जाणवूं लागतो. " सृष्टि मला हांसविते " असें सांगून " आनंदी-आनंद गडे " असें गाणारे बालकवि खरोखर आंतून कोणत्या वृत्तीचे होते ? या प्रश्नाचें उत्तर देण्यासाठीं बालकवींच्या खऱ्या अंतर्मनाचें नीट दर्शन घडविणाऱ्या त्यांच्या उत्कट भावगीतांकडे वळलें पाहिजे. अशा भावगीतांमध्यें " पांखरास " , " खेड्यांतील रात्र ", "पारवा", " औदुंबर " अशीं गीतेंच जास्त आवडून येतील व त्यांच्यामध्यें एकच सूर आहे, तो म्हणजे विरक्तिपूर्ण शोकाचा. " येईल एक परि धन्य दिवस सौख्याचा । जो करिल तुझ्यासह अंत तुझ्या गीताचा ॥ " ह्या दोन ओळींमध्यें बालकवींच्या अंतःकरणांतील ह्या शोकाचे सूर उठले आहेत; नेमकी याच्या उलट वृत्ति पंतजींच्या आधींच्या व आतांच्या सर्वच काव्यांत स्थायी स्वरूपांत आहे. ते स्वभावतःच दुःखानुगामी नसून आशावादी आहेत.

## लोकजीवनाशीं कलात्मक तादात्म्य

पंतजींचा हा स्वाभाविक आशावादहि दुसऱ्या एका प्रवृत्तीनें पुष्ट व स्थिर झालेला आहे. मागें मीं सांगितलेंच आहे कीं, सन १९२०नंतर त्यांनीं राष्ट्रीय किंवा वर्गीय लढ्यांत स्वतः भाग घेतलेला नाहीं. परंतु तरी देखील त्यांनीं बहुजनसमाजाशीं आपला संबंध दृढ केला आहे. " ग्राम्या " व " युगवाणी " या त्यांच्या अलीकडच्या काव्यसंग्रहांत खेड्यांतील जीवनाशीं कवीची तद्रूपता अनुभवास येते. एका शेतकऱ्याच्या मुलीला उद्देशून त्यांनीं लिहिलेली कविता घेतली तर तींतील वर्णनामध्यें जराहि कृत्रिमता दिसत नाहीं. तिला उगीच " देवता " बनविलेलें नाहीं वा तिच्यावर निरागसपणाचा भारहि उगीच टाकलेला नाहीं; उलट साधें सरळ शेतकरी-तरुणीचें वर्णन आहे. ती कोणी वेषांतरित नागरकन्या आहे असा रसभंग करणारा सूरहि त्या वर्णनांत कोठें आढळत नाहीं. या कवितेच्या शेवटीं कवीनें म्हटलें आहे,

" रे दो दिन का
उसका यौवन !
रूप ना छिन का
दुःखों से पिस
दुर्दिन में घिस
जर्जर हो जाता उसका तन !
ढह जाता असमय यौवन—धन !
बह जाता तट का तिनका (गवताची काडी)
जो लहरोंसे हँस खेला कुछ क्षण ! "

शेतकरी—तरुणीचें वर्णन करतांना शेतकऱ्यांच्या व्यापक जीवनांतील वाताहतीचें भान ठेवण्याची व ग्रामजीवनाच्या शोकपूर्णतेशीं तादात्म्य राखण्याची शक्ति पंतजींच्यामध्यें आहे. या तादात्म्यामुळेंच "जीवनावरील अंतर्विश्वास" त्यांच्या ठिकाणीं अखंड जागृत आहे.

## " धोबियोंका नृत्य "

आणखी एका तऱ्हेनें लोकजीवनाशीं पंतजींचें मन एकरूप झालेलें आढळतें. लोकांच्या जीवनांतील दारिद्र्याची जाणीव व त्यांच्यावर होणाऱ्या क्रूर अन्यायांबद्दल चीड ह्या भावना तर पंतजींच्या मध्यें आहेतच, पण शिवाय लोकांच्या अंगांत आज सुप्त असलेली शक्ति सुद्धां त्यांना ओळखतां येत आहे. कमालीच्या कंगालपणानें ओंगळ असलेल्या झोंपड्यांच्या वसत्यांतून सारें जीवन कंठणाऱ्या गरीब लोकसमूहाच्या मनांत किती पीळ व उत्साह आहेत व रक्तांत किती रग आहे याची प्रचीति पंतजींना येते, ती या लोकांच्या सामूहिक नाचांत ! संयुक्त-प्रांतांत धोबी, कहार वगैरे जमाती " पंचाईत "—पद्धतीनें अजून बांधलेल्या आहेत व त्यांच्या जमातीचे उत्सव म्हणजे एक प्रकारें सामूहिक आनंदाचें, शक्तीचें व मुक्ततेचें खुलें निदर्शनच असतें.

अशा एका उत्सवमग्न जनसमूहाला उद्देशून पंतजी एका कवितेंत म्हणतात,

" वाद्यांच्या उन्मत्त घोषानें व थरारणाऱ्या गानस्वरानें जनतेच्या इच्छांचें गाढ चित्र माझ्या हृदयावर अंकित झालें आहे.

क्षणभर तुम्हीं माझ्या मनापुढें नवी सृष्टि उत्पन्न केली. जन—संस्कृतीचें प्रकाशमय सुंदर स्वप्न तुम्हीं मला दाखविलें.

अनेक युगांच्या मिथ्याभासानें माझें हृदय व्याकुळ आहे.








परंतु जनमानसाचा हा गौरव पाहून माझें मन विस्मित आहे व भविष्याच्या चिंतनांत गढलेलें आहे. "

—जनसंस्कृतीचें स्वप्न कंगाल कहारांच्या नृत्योत्सवांत पाहणारे पंतजी हे जनमनाशीं तद्रूप आहेत व खरेखुरे लोकांचे कवि आहेत, असें मला वाटतें. त्यांचे उद्गार नीट पाहा ! त्यांत पांढरपेशा माणसाची आढ्यता नाहीं व " सहानुभूति " नाहीं; उलट प्रांजलपणें कवि म्हणतो कीं " मिथ्याभासानें माझेंच हृदय व्याकुळ आहे."

## मार्क्सवादी नसून जीवचैतन्यवादी

पंतजींच्या काव्यामध्यें समतावादाची स्पष्ट व जोरदार मांडणी केली आहे व "ग्राम्या"मध्यें तर मार्क्सच्या गौरवाचीं काव्यें आहेत व कामगार-वर्गाला "क्रांतीचा शिल्पी" म्हणून संबोधिलेलें आहे. यावरून पंतजींना कोणी कोणी मार्क्सवादीच म्हणूं लागले. पंतजींनीं स्वतः या बाबतींत घेतलेली भूमिका स्पष्ट आहे; ते स्वतःला अध्यात्म व मार्क्सवाद या दोन्ही सिद्धान्तांचे अनुयायी समजतात. परंतु वेदान्तामध्यें परम साध्य म्हणून सांगितलेली "परिणत व्यक्ति की प्राकृतिक मुक्ति" आणि मार्क्सवादांतील "रक्तक्रांति" ह्या दोन पर्यायांचा स्वीकार ते करीत नाहींत.

त्यांच्या या समन्वयाच्या भूमिकेच्या जोडीला त्यांचा कम्युनिस्ट पक्षाविषयींचा मित्रभाव घेतला पाहिजे. कम्युनिस्ट पक्षाचे एक नेते पूरणचंद्र जोशी हेहि अलमोडा प्रांतांतलेच असून पंतजींचे मित्र आहेत. इतरहि अनेक कम्युनिस्टांशीं त्यांचा संबंध आहे व कम्युनिस्ट पक्षाशीं राजकीय दृष्टीनें तीव्र मतभेद असूनहि, सन १९४२नंतरच्या काळांत त्यांनीं पक्षाशीं दृढ मैत्री राखली आहे. परंतु हें सर्व असूनहि त्यांना खऱ्या अर्थानें मार्क्सवादी मात्र म्हणतां येणार नाहीं. याचें मुख्य कारण असें कीं, त्यांच्या काव्याच्या मागें जी तात्त्विक ( म्हणजे तत्त्वज्ञानात्मक ) भूमिका आहे ती जीवचैतन्यवादाच्या (Vitalism च्या) सिद्धान्तावर आधारलेली आहे. पंतजींच्या मनांतील हा सिद्धान्त बर्गसाँच्या युरोपीय व्हायटॅलिझमशीं भारतीय प्रकृतिवादाचें मिश्रण होऊन बनला आहे व मार्क्सच्या वस्तुवादानें या संमिश्र प्रकृतिवादाला एक प्रकारची नवी शक्ति व स्थैर्य आलीं आहेत.

## अरविंदाश्रमांतील वास्तव्यानंतर

सन १९४५पर्यंत पंतजींच्या काव्याची व तत्त्व-भूमिकेची अवस्था वर सांगितल्याप्रमाणें होती. त्यानंतरच्या काळांत एका दीर्घ व जिवावरच्या दुखण्यांतून पंतजींचा पुनर्जन्म झाला व विश्रांतीसाठीं ते पांदिचरीला अरविंदबाबूंच्या आश्रमांत गेले. अरविंदांच्या योग--तत्त्वज्ञानानें ते प्रभावित झाले असून त्यांच्या अगदीं अलीकडच्या काव्यावर या नव्या संस्काराचा परिणाम झालेला आहे. "स्वर्ण-धूलि " व " स्वर्णकिरण " या नव्या काव्यसंग्रहांत "ग्राम्या"मधील वस्तुवादी व लोकजीवनाच्या आशयानें परिपूर्ण काव्य नाहीं. परंतु तसें पाहतां योगदर्शनाचा हा संस्कार पंतजींच्या मनावर नव्यानें होणारा संस्कार नसल्यामुळें "ग्राम्या"पेक्षां वेगळी सृष्टि जरी नव्या पंतकाव्यांत अवतरली तरी त्यांच्या मानवधर्माचा आविष्कार मात्र पूर्वींप्रमाणेंच नव्या काव्यांतूनहि झालेला आहे.

पंतजींच्या काव्याचा खरा परिचय करून घेण्यासाठीं पंतजींचें विस्तृत काव्य, त्यांचे स्वतःचे आत्मपरीक्षणात्मक लेख व समकालीन हिंदी टीकाकारांचीं मतें तपशीलवार वाचलीं पाहिजेत. या दिशेनें अल्पसा प्रयत्न मीं केला असून तो पुस्तिकेच्या रूपानें छापला आहे. पण तो प्रयत्नहि अगदीं तोकडाच आहे. प्रस्तुत लेखांत जेवढा ओझरता परिचय करून देणें मला शक्य झालें आहे, त्यावरून मराठी वाचकांना पंतजींचें काव्य अभ्यासण्याची जरूरी कळून येईल, अशी मला आशा आहे. ब्रिटिश राजवटीच्या अंधारांत व आज स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या नवयुगांत आपल्याबरोबर सहप्रवास करणाऱ्या भिन्नभाषी लोकसमूहांच्या "आत्म्या"शीं आपण महाराष्ट्रीयांनीं खरीखुरी ओळख करून घेतली पाहिजे आणि त्यासाठीं भारतीय भाषांतील पंतजींसारखे कवि हेच आपले उत्तम वाटाड्ये ठरूं शकतील








# पुणें-विश्वविद्यालय : इष्ट नवीन दिशा

प्रा. के. रा. कानिटकर

पुणें-विश्वविद्यालय स्थापण्याबद्दलचें बिल पास झालें, त्याचा नुकताच कायदाहि झाला व आतां विश्वविद्यालय लवकरच स्थापिलें जाणार. कोणी म्हणतात १९५०च्या जूनमध्यें या विश्वविद्यालयाचें काम सुरू होईल; कांहींचें म्हणणें व इच्छा कीं पुणें-विश्वविद्यालयाचें काम जून १९४९मध्येंच सुरू व्हावें. प्राथमिक व्यवस्था करण्याकरितां व्हाइसचॅन्सेलर नेमले गेले असून त्यांना लागणारें मदत-मंडळहि लवकरच नेमलें जाईल. समाधानाची गोष्ट ही कीं नेक नामदार डॉ. मुकुन्दराव जयकर हेच पहिले व्हाइस-चॅन्सेलर नेमले गेले आहेत. डॉ. जयकरांचा संबंध या विश्वविद्यालयाची मूळ कल्पना व योजना यांपासून असल्याकारणानें त्यांतील सर्व खांचाखोंचा व अडचणी त्यांना पूर्ण माहीत आहेत. तरी सुद्धां या विश्वविद्यालयाचें स्वरूप प्राधान्येंकरून कसें असावें याबद्दलच्या कल्पना लोकांकडून सुचविल्या गेल्यास बॅ. जयकरांचे हात जास्तच बळकट होतील असा भरंवसा आहे.

## परीक्षांचें पावित्र्य राखलें पाहिजे

मुंबई-विश्वविद्यालयाच्या कारभाराचा भार हलका व्हावा या दृष्टीनें पुणें-विश्वविद्यालयाचा उपयोग आहेच. पुणें-विश्वविद्यालयाशिवाय कर्नाटकांत एक व गुजराथेंत दुसरें अशीं आणखी दोन विश्वविद्यालयें निकटवर्ती भविष्यकाळांत अस्तित्वांत येणार असल्यामुळें मुंबई-विश्वविद्यालयाच्या कारभाराचा भार जास्तच हलका होऊन त्या विश्वविद्यालयाला जास्तच आटोपशीरपणा व कार्यक्षमता लाभतील. या दृष्टीनें पाहतां पुणें-विश्वविद्यालयास सुद्धां मुंबई-विश्वविद्यालयाचा कारभार नुसता हलका करून थांबतां येणार नाहीं. सर्वच चारहि विश्वविद्यालयांना सध्यांच्या स्थितीपेक्षां फार उच्च दर्जाची स्थिति प्राप्त होईल अशी आशा आहे. मुंबई-विश्वविद्यालयांत कांहीं अतिशय घाणेरडे प्रकार प्रचलित आहेत, अशी पुष्कळ जणांची समजूत आहे. त्याबद्दल खासगी रीतीनें पुष्कळ लोक बोलतात; परंतु अशीच कांहीं विकट संघटना झाली आहे कीं त्यामुळें ' तेरी चुप, मेरी चुप ' अशी प्रवृत्ति उत्पन्न झाली आहे. जो दोष जडला आहे, त्याचा उच्चार केला असतां सभांतून व सीनेटमध्यें सुद्धां त्या दोषाचें अस्तित्व नाहींच असा ठराव पसार होऊं शकतो. हा दोष चवाठ्यावर आणून विश्वविद्यालयाची शुद्धता करून घेण्याची धडाडी व ताकद मुंबई-विश्वविद्यालयाला विशेषतः त्याच्या फापटपसाऱ्यामुळें राहिलेली नाहीं. हा मोठा दोष म्हणजे अप्रामाणिकपणा व त्यामुळें उत्पन्न झालेली आत्मवंचना. परीक्षेचें पावित्र्य जवळजवळ नामशेष झालेलें दिसतें. तें पावित्र्य टिकविण्याच्या दृष्टीनें मुंबई-विश्वविद्यालयानें मधून मधून प्रयत्न केले आहेत, नाहीं असें नाहीं; परंतु ते प्रयत्न जितके दूरगामी व्हावयास पाहिजेत तितके झाले नाहींत. ह्या दोषाचें बरेंचसें कारण निवडणुकीपासून उत्पन्न होतें; आन्तरमहाविद्यालयीन संबंधांतहि त्याचें मूळ आहे. होणाऱ्या परीक्षकांचीं मतें मिळविण्याच्या दृष्टीनें त्यांना परीक्षक नेमण्याचें आमिष प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीनें दाखविलें जातें. निवडून आलेला माणूस आपणाला परीक्षक नेमील या आशेनें मतें दिलीं जातात व त्या अपेक्षेप्रमाणें परीक्षक म्हणून नेमणूक झाल्यावर ज्या निवडलेल्या










इसमाच्या वजनामुळें नेमणूक झालेली असते त्या गृहस्थाकडून अशा परीक्षकांना उत्तरपत्रिका तपासत असतांना निरनिराळे निरोप येतात; तसेंच निरनिराळ्या कॉलेजांतील कांहीं अध्यापक एकमेकांच्या कॉलेजांतील विद्यार्थ्यांना ते नापास होत असतांना सुद्धां कमीजास्त मार्क देऊन पास करून घेतात. कांहीं कांहीं अध्यापक त्याहीपुढें जाऊन परीक्षक म्हणून नेमले गेल्यानंतर संभाव्य प्रश्न म्हणून आपल्या विद्यार्थ्यांकडून प्रश्न सोडवून घेतात व ते प्रश्न प्रश्नपत्रिकेंत आलेले दिसतात. ह्या तऱ्हेनें हा घाणेरडा प्रकार चालू आहे. याबद्दल प्रत्यक्ष पुरावा मिळणें अशक्य नसलें तरी असंभाव्य मात्र आहे. खासगी रीतीनें हा घाणेरडा प्रकार पूर्णपणें कळतो; परंतु कायद्याच्या दृष्टीनें तो सिद्ध करणें कठिण जातें. परीक्षा चालविण्याकरितां नेमलेले सुपरवायझर्स विद्यार्थ्यांना मदत करतांना आढळलेले आहेत. या प्रकारास शक्य तर आळा बसावा म्हणून परीक्षा चालविण्याकरितां दुसऱ्या ठिकाणांहून सीनिअर सुपरवायझर पाठविले गेले आहेत. या सर्व गोष्टींचा परिणाम अतिशय किळसवाणा झालेला आहे. हे घाणेरडे प्रकार करतांना बरें वाटलें तरी ते झाल्यानंतर एकमेकांविषयीं तुच्छता उत्पन्न झाल्यावांचून राहत नाहीं. ज्या विद्यार्थ्यास मदत केली गेली तो विद्यार्थी मदत करणाराला प्रौढपणीं प्रामाणिकपणाच्या दृष्टीनें तुच्छ मानूं लागतो. असें ऐकिवांत आहे कीं कांहीं अध्यापकांनीं ह्या कृत्यांच्या समर्थनार्थ तात्त्विक भूमि तयार केली आहे. "रोजच्या रोज वर्गामध्यें जें आम्ही शिकवितों ती विद्यार्थ्यांना मदत नाहीं का ? हें जर खरें आहे तर परीक्षेच्या वेळेला मदत करणें हें पाप कसें ठरतें ? विद्यार्थ्यांना मदत करावी ही भूमिका शिक्षकांनीं पतकरल्यानंतर त्या भूमिकेला अनुसरून परीक्षेच्या वेळीं सुपरवायझर असतांना मदत केली तर त्यांत बिघडतें कोठें ? " परीक्षेच्या उत्तरपत्रिका तपासणाऱ्यांकडे विद्यार्थ्यांचे कांहीं पालकहि जातात व विनंति करतात कीं, विद्यार्थ्याला जर शंभरांपैकीं पांच मार्क मिळाले असतील तर त्या पांचामागें आणखी एक पांचाचा आंकडा घालण्यांत फक्त पेन्सिलीचीच थोडीशी झिज होणार; यापेक्षां आम्ही तुमच्यापाशीं जास्त कांहीं मागत नाहीं. व्यवहारामध्यें व विशेषतः व्यापारामध्यें नेहमीं तडजोडीचें धोरण स्वीकारावें लागतें. त्या दृष्टीनें एकमेकांना अडचणींतून काढणें हें कर्तव्य ठरत नाहीं का ? या तत्त्वज्ञानामागें बहुतेक वेळां पैशाचाहि पाठिंबा असतो. असले घाणेरडे प्रकार जितके सांगावे तितके थोडेच. तात्पर्य काय कीं परीक्षा शुद्ध झाल्या पाहिजेत व आत्मवंचना पूर्णपणें थांबविली पाहिजे. अशा प्रकारें पास झालेला मुलगा सुद्धां पास करणाऱ्यांना व विश्वविद्यालयांना कमी लेखीत राहतो. परीक्षा घेण्याची रीत अवश्य असल्यास बदलावी ; परंतु वरीलसारख्या घाणेरड्या प्रकारांचा पुणें—विश्वविद्यालयांत उद्भव सुद्धां होऊं नये अशी खबरदारी प्रारंभापासूनच घेतली पाहिजे. विशेषतः पुणें—विश्वविद्यालय जे अभ्यासक्रम स्वतः शिकवून विद्यार्थ्यांची परीक्षा घेणार आहे त्यांत प्रारंभापासूनच चोखपणा उत्पन्न झाला पाहिजे. विश्वविद्यालयाची इभ्रत ह्या गोष्टीवर फार अवलंबून आहे.

## शिक्षणांत उच्च कार्यक्षमता आली पाहिजे

दुसरी गोष्ट अशी कीं नवीन पुणें—विश्वविद्यालयांत कार्यक्षमता फार मोठ्या प्रमाणांत उत्पन्न झाली पाहिजे. ह्या दृष्टीनें पाहतां शिक्षणपद्धतींत बराच बदल करावा लागेल. व त्याबरहुकूम परीक्षा घेण्याची पद्धतीहि बदलावी लागल्यास मागेंपुढें पाहतां कामा नये. शिकविण्याच्या दृष्टीनें पाहतां व्यवस्था अशी झाली पाहिजे कीं अध्यापकांची व्याख्यानें झाल्यानंतर स्वाध्यायपद्धतीचा (Tutorial Systemचा) अवलंब करून अध्यापकांच्या मार्गदर्शनाखालीं विद्यार्थ्यांचे अभ्यास करून घेतले पाहिजेत. हीं ट्यूटोरिअल्स् किंवा हे स्वाध्याय यांमध्यें व्याख्यानवाजी होतां कामा नये. ह्याकरितां विद्यार्थ्यांचे लहानलहान गट करून त्यांजबरोबर शिक्षकांचा निकट संबंध आला पाहिजे. विद्यार्थ्यांना काय काय अडचणी येतात त्या समजावून घेऊन त्या दूर करण्यासाठीं शिक्षकांकडून मार्गदर्शन झालें पाहिजे. ही मार्गदर्शनपद्धति काय आहे व ती कशी वापरावयाची याबद्दलचें शिक्षण अध्यापकांना दिलें पाहिजे. त्यांना विद्यार्थ्यांचें मानसशास्त्र ह्या विषयाचा परिचय करून










दिला पाहिजे. ह्या बाबीकडे सध्यां कांहींच लक्ष नसल्यामुळें विद्यार्थी अर्धे–कच्चे बाहेर पडतात व त्यामुळें देशाचें नुकसान होत आहे ही जाणीव सर्वसामान्यपणें अध्यापकांना व भावी पुणें–विश्वविद्यालयाला तीव्रपणें झाली पाहिजे. तसेंच जे विद्यार्थी बुद्धिमांद्यामुळें नालायक असतील त्यांना त्यांची नालायकी शक्य तितक्या लवकर कळविण्याची व्यवस्था झाली पाहिजे. तसेंच दोन वर्षांचे अभ्यास एका वर्षांत कोंबून किंवा एका वर्षाचे अभ्यास दोन महिन्यांत दडपून विषयाचें ज्ञान कसें तरी होणें व परीक्षेंत कसें तरी पास होणें ह्या गोष्टी फार घातक आहेत ही जाणीव भावी विश्वविद्यालयानें अध्यापकांस व विद्यार्थ्यांस करून दिली पाहिजे. कार्यक्षमता वाढण्याच्या दृष्टीनें अवश्य असल्यास दोन प्रकारच्या परीक्षा सुरू कराव्या लागल्यास तसें करण्यास कचरतां कामा नये. तसेंच पुणें–विश्वविद्यालयाशीं संबंध असलेल्या महाविद्यालयांमध्यें (Affiliated Collegesमध्यें) शिक्षणाच्या तजविजी पुऱ्या आहेत किंवा नाहींत याबद्दल अतिशय काळजी घेतली पाहिजे. असा अनुभव आहे कीं पुरीं उपकरणें नसतांना सुद्धां विषय शिकविले जातात. विशेषतः शास्त्रीय विषयांत ही गोष्ट घडतां कामा नये. अभ्यासक्रम पुरा न करतां पासापुरते मार्क मिळविण्याइतकाच तो तयार करावयाचा अशी प्रवृत्ति अध्यापक व विद्यार्थी यांमध्यें सर्रास उत्पन्न झाली आहे, ही गोष्ट डोळ्यांआड होतां कामा नये.

वर म्हटल्याप्रमाणें सामान्य विद्यार्थ्यांकरितां साधी परीक्षा घेण्याचें ठरवून त्यांना इतर चांगल्या व पुष्कळ श्रम करण्याची इच्छा असणाऱ्या विद्यार्थ्यांपासून प्रथमपासूनच वेगळें केलें पाहिजे. सरमिसळीनें दोन्ही प्रकारच्या विद्यार्थ्यांना एके ठिकाणींच शिक्षण दिल्यास तें हिणकस प्रतीचें होतें. ह्याकरितां ज्यांना अभ्यासाविषयीं बुद्धि व उत्साह नाहींत त्यांना उत्साही विद्यार्थ्यांपासून वेगळें काढल्याशिवाय विश्वविद्यालयाचा दर्जा वाढणार नाहीं. ही गोष्ट साधण्याकरितां शिक्षकांचा दर्जाहि वाढविला पाहिजे इतकेंच नव्हे, तर विश्वविद्यालयांतील व महाविद्यालयांतील अध्यापकांना सुद्धां शिक्षणपद्धति, मानसशास्त्र वगैरे विषयांचें शिक्षण दिलें पाहिजे. कार्यक्षमतेच्या दृष्टीनें विचार करतां पुण्याच्या बाहेरील कॉलेजांना मान्यता देतांना विशेष खबरदारी घेतली पाहिजे. विषय शिकविण्याच्या दृष्टीनें सामग्री काय असावी, याविषयीं विश्वविद्यालयानें उपकरणांच्या याद्या तयार करून त्यांबरहुकूम कॉलेजांनीं उपकरणसामग्री सुसज्ज केल्याशिवाय त्यांना मान्यता देतां कामा नये. या बाबतींत मुंबई–विश्वविद्यालयानें अतिशय ढिलाई ठेवलेली आहे. त्यामुळें इन्स्पेक्शन–कमिटीच्या लहरींवर पुष्कळशा गोष्टी अवलंबून राहतात. पुण्याबाहेरील कॉलेजांना मार्गदर्शनाची आवश्यकता आहे. या दृष्टीनें निदान काय काय सामग्री असावी याची माहिती करून देण्याचें काम विश्वविद्यालयाचें आहे. ज्या कॉलेजास मान्यता पाहिजे असते, तें कॉलेज विश्वविद्यालयाकडून सहानुभूतीची अपेक्षा करतें. ही सहानुभूति देणें योग्य आहे; परंतु ती देत असतां कार्यक्षमता मात्र कमी होतां कामा नये हें विश्वविद्यालयानें प्रामुख्यानें आपल्या नजरेपुढें ठेवलें पाहिजे. ज्यायोगानें विद्यार्थ्यांच्या शिक्षणांत कमीपणा राहील अशा प्रकारची सहानुभूति विश्वविद्यालयानें दाखवितां कामा नये. विशेषतः नैपुण्यदर्शक अभ्यासक्रमांबद्दल ( Honours Coursesबद्दल) मान्यता देण्याचे वेळीं अतिशय खबरदारी घेतली पाहिजे. लागणारे पुस्तकसंग्रह व आवश्यक उपकरणें ह्यांचा पुरा पुरवठा असल्याखेरीज ' ऑनर्स कोर्सेस ' काढण्याची परवानगी पुण्याबाहेरील कॉलेजांना देतां कामा नये. ह्याबद्दल जितका कडकपणा राखतां येईल त्या मानानें विश्वविद्यालयाची कार्यक्षमता वाढणार आहे. अर्थात्च येथें हें गृहीत धरलें आहे कीं ज्या विषयांच्या बाबतींत 'ऑनर्स कोर्सेस्'चें शिक्षण पुणें–विश्वविद्यालय आपल्या हातीं घेईल त्या सर्व विषयांच्या बाबतींत सर्व प्रकारें सुसज्जता विश्वविद्यालयांत केली गेल्याशिवाय विषयांचें अध्यापन सुरू होणार नाहीं. कार्यक्षमता उत्पन्न करण्याच्या दृष्टीनें विशेषतः पदवी–परीक्षा घेण्याची रीतहि बदलावी लागेल. परीक्षेंत तोंडी छाननी करण्याचीहि व्यवस्था करावी लागेल.

## मुंबई विद्यापीठाच्या 'प्रिन्सिपल' व 'सब्सिडिअरी' या विभागणीचा अनुभव

तिसरा मुद्दा असा कीं, मुंबई–विश्वविद्यालयामध्यें ज्या तऱ्हेचे अभ्यासक्रम सध्यां चालू आहेत, त्या प्रकारचे घेतांना त्यांत पुणें–विश्वविद्यालयानें बराच फरक करून ते घेतले पाहिजेत. विशेषतः पदवी–परीक्षेच्या दृष्टीनें हा फरक अवश्य आहे. 'ऑनर्स कोर्सेस्'च्या दृष्टीनें तर ह्या बदलाची फारच आवश्यकता आहे. पदवी–परीक्षेमध्यें बऱ्याच ठिकाणीं सामान्य तत्त्वज्ञान हा विषय असतो. तो विषय फार खोलांत न शिरतां प्रत्येक 'ऑनर्स कोर्स'ला आवश्यक विषय म्हणून घालणें अवश्य आहे. ह्या विषयामुळें आवडत्या विषयांत कशी प्रगती होत आहे, व करावी ह्याचें मार्गदर्शन होईल. तत्त्वज्ञान हें सर्व विषयांचें शास्त्र आहे. तें शास्त्रांचेंहि शास्त्र आहे ही गोष्ट लक्षांत घेतली असतां हा विषय पदवी–परीक्षेंत अवश्य कां असावा, ह्याचा उलगडा होतो. दुसरी सुधारणा अशी पाहिजे कीं, ज्या विषयांत 'ऑनर्स' घ्यावयाचे त्या विषयाशीं संलग्न जे इतर विषय असतील त्यांचाहि अभ्यास कांहीं मर्यादेपर्यंत अवश्य झाला पाहिजे. सध्यां मुंबईविश्वविद्यालयांत बी. एससी. पदवीच्या बाबतींत मुख्य (Principal) एक व गौण (Subsidiary) एक असे दोन विषय घ्यावे लागतात. 'सब्सिडिअरी' विषय एक वर्षांत कसा तरी संपवून दुसरें वर्ष 'प्रिन्सिपल' विषयाकरितां घालवितां यावें अशी प्रथा प्रत्यक्ष व्यवहारांत आलेली आहे. त्यामुळें मूळ हेतु बाजूला सारला जाऊन त्याला विकृत स्वरूप आलेलें आहे. दोन 'टर्म्स' भरल्यानंतर म्हणजे एक वर्ष झाल्यानंतर 'सब्सिडिअरी' विषयाच्या परीक्षेस बसण्यास विशेषतः हुषार मुलांच्या दृष्टीनें हरकत नाहीं अशी जी मूळ मनोभूमिका तिचा विपर्यास झाला आहे. ह्यांत असें गृहीत धरलें होतें कीं, फक्त हुषार विद्यार्थीच एक वर्षांत 'सब्सिडिअरी' विषयाचा अभ्यास पुरा करूं शकतील. परंतु तें सर्व एका बाजूला सारून शक्य तों प्रत्येक विद्यार्थ्यानें सब्सिडिअरी विषयाचा अभ्यास एक वर्षांत संपवावा, अशी खुबीची सक्ती विद्यार्थ्यांवर बहुतेक सर्व कॉलेजांत केली जाते. कांहीं कांहीं विषय असे आहेत कीं, आखलेला अभ्यासक्रम 'सब्सिडिअरी' विषयाच्या बाबतींत एका वर्षांत समाधानकारक रीतीनें पूर्ण करणें शक्यच नाहीं. पदार्थविज्ञान (Physics) व गणित हे दोन विषय तरी निदान दोन अधिवेशनांमध्यें (Termsमध्यें) म्हणजे एका वर्षामध्यें समाधानकारक रीतीनें शिकविणें व शिकणें सर्वसाधारण विद्यार्थ्यांच्या दृष्टीनें शक्यच नाहीं. परंतु खुबीची सक्ती केल्यामुळें शिक्षकांची व विद्यार्थ्यांची ह्या बाबतींत गडबड–घाई होऊन त्या विषयांतील ज्ञान अर्धवटवडें राहून जातें. परीक्षेंत सुद्धां हा अर्धवटपणा राहिलेला आढळला तरी त्याचेकडे उपेक्षायुक्त नजरेनें पाहिलें जातें. कित्येक ठिकाणीं ह्या खुबीच्या सक्तीमुळें 'प्रिन्सिपल' विषयाचा अभ्यास शिक्षक व विद्यार्थी पहिल्या वर्षांत फारसा करीतच नाहींत. त्यामुळें 'प्रिन्सिपल' विषयाची कोंबाकोंबी व कुचंबणा दुसऱ्या वर्षांत झाल्याशिवाय राहत नाहींत. तात्पर्य, ह्या पद्धतीमुळें 'प्रिन्सिपल' व 'सब्सिडिअरी' विषयांचे अभ्यास जसे काळजीपूर्वक व्हावयास पाहिजेत तसे न होतां दोन्हीहि वर्षांत घाईच घाई केली जाते. त्यामुळें प्रत्येक ठिकाणीं अर्धकचेपणा राहून कसें तरी रेटून नेण्याची प्रवृत्ति शिक्षकांत व विद्यार्थ्यांत उत्पन्न होते. कसें तरी काम करण्याची ही संवय जडल्यामुळें तिचा परिणाम पुढील आयुष्यावर झाल्याशिवाय राहत नाहीं. पदवी–परीक्षा झाल्यानंतर संशोधन–कार्याकडे प्रवृत्ति होण्याच्या दृष्टीनें ह्या दोन्हीं वर्षांचा काल फुकट गेलेला आढळतो. ह्या तऱ्हेनें पास झालेले विद्यार्थी केवळ सांगकामे बनतात. आपली बुद्धि चालविण्याच्या दृष्टीनें विद्यार्थ्यांत प्रवृत्तीच उत्पन्न होत नाहीं. सर्व अभ्यास घाईघाईनें केले गेल्यामुळें विद्यार्थी केवळ शिक्षकांनीं दिलेल्या टिपणांवर अवलंबून राहतो व त्यामुळें केवळ परीक्षेंत येणाऱ्या संभाव्य प्रश्नांचाच अभ्यास करण्याकडे प्रथमपासूनच त्याची प्रवृत्ति होऊन विषयाच्या 'खऱ्या अभ्यासा'कडे दृष्टीच वळत नाहीं. अशा परिस्थितींत संशोधन–कार्यास योग्य असे विद्यार्थी कसे निर्माण होणार ? ह्या दृष्टीनें पाहतां ही तऱ्हा संपूर्णपणें पुणें–विश्वविद्यालयानें बदलून टाकली पाहिजे.










## पुणें–विश्वविद्यालय : इष्ट नवीन दिशा

### पदवी–परीक्षांचा उच्च दर्जा कसा राखतां येईल?

पूर्वी उल्लेखिलेला तिसरा मुद्दा जास्त विशद केला पाहिजे. तो मुद्दा म्हणजे पदवीपरीक्षेचे अभ्यासक्रम अगदीं निराळ्या तऱ्हेनें बनविले पाहिजेत. ते बनवितांना मुख्य मुद्दा डोळ्यांपुढें ठेवावयाचा तो असा कीं 'ऑनर्स'करितां घेतलेल्या विषयांची तयारी विद्यार्थ्याला जास्त कार्यक्षम होऊन करतां यावी व ज्ञात आणि अज्ञात ह्यांच्या सीमेवरून अज्ञाताकडे दृष्टि फेंकणें शक्य व्हावें. याचाच अर्थ असा कीं, मुख्य विषयाचा अभ्यास साकल्यानें झाला पाहिजे. 'प्रिन्सिपल' व 'सब्सिडिअरी' असा भेद न ठेवतां 'प्रिन्सिपल' व 'सप्लिमेंटरी' (पूरक) असे संबंध ह्या विषयांमध्यें उत्पन्न झाले पाहिजेत. एक विषय मुख्य व बाकीचे त्यास परिपोषक असले पाहिजेत. परिपोषक विषय किती राहतील हें मुख्य विषयाच्या प्रकारावर वा त्यांतील आशयावर अवलंबून राहील. उदाहरण देणें झाल्यास (Geology) भूस्तरशास्त्र हा मुख्य विषय विद्यार्थ्यांनें घेतला असें मानलें तर त्यास उपकारक असे विषय सांगावयाचे झाल्यास Dynamics, Physics, Chemistry, Botany, Zoology व Line drawing इतके होऊं शकतील. ह्यांतील प्रत्येकाचें योग्य तें प्राथमिक ज्ञान जर नसेल तर Geology चा खरा अभ्यास होणेंच शक्य नाहीं. पदार्थविज्ञान (Physics) हा मुख्य विषय असला तर त्यास Mathematics, Chemistry, Manual Training, Glass blowing हे विषय सहायक होतील. Chemistry हा विषय मुख्य धरला तर त्यास Physics, Mathematics, Glass-blowing, Biology हे विषय अवश्य सहायक म्हणून ठरतील. इतके विषय कसे शिकवावे ह्याबद्दल शंका–उपशंका उत्पन्न होणें साहजिक आहे. दोन वर्षांचा काल ह्यास पुरा पडणार नाहीं हेंहि स्पष्ट आहे. परंतु 'ऑनर्स–डिग्री'च्या दृष्टीनें विद्यार्थी कसा तरी ओढून काढावयाचा ही दृष्टि मात्र असतांच कामा नये. इंटरमीजिएट परीक्षा झाल्यानंतर ऑनर्स–डिग्रीकरितां तीन वर्षें लागलीं तरी हरकत घेतां कामा नये. साधी पदवी दोन वर्षांनंतर दिली तरी हरकत नाहीं. त्या पदवीला किती विषय ठेवावयाचे व त्यांचा दर्जा कोणता राखावयाचा हा प्रश्न अगदीं वेगळा ठेवला पाहिजे. वर नमूद केलेली 'ऑनर्स–पदवी'ची कल्पना पुरी सांगावयाची झाल्यास असें नमूद करावें लागेल कीं प्रत्येक विषयाचे योग्य दर्जाचे तीन किंवा चार अभ्यासक्रम करावे. मुख्य विषय जो असेल त्याचे चारीहि अभ्यासक्रम विद्यार्थ्यांनें पार पाडले पाहिजेत व त्याला पूरक जे विषय सांगितले जातील, त्यांतील किमान दर्जाचे दोन अभ्यासक्रम आवश्यक म्हणून ठेवावे लागतील. उदाहरणार्थ, पदार्थविज्ञान विषय मुख्य धरला तर त्याला सहायक विषय वर नमूद केले आहेत त्यांपैकीं 'केमिस्ट्री'चे दोन अभ्यासक्रम, गणिताचे दोन अभ्यासक्रम व 'Manual Training'चा एक व Glass-blowing चा एक असे अभ्यासक्रम सहायक म्हणून राहतील. या सर्व सहायक अभ्यासक्रमांत पास झाल्याशिवाय मुख्य विषयाची परीक्षा देतां येणार नाहीं असा निर्बंध असावा. पहिल्या अडीच वर्षांमध्यें सहायक अभ्यासक्रमाच्या परीक्षा योग्य अभ्यास झाल्यावर केव्हांहि देतां याव्या. या सहायक विषयांच्या परीक्षा पास होण्याकरितां प्रत्येक अभ्यासक्रमांत शेंकडा ७५ ते ८० गुण मिळविले पाहिजेत असा निर्बंध अवश्य आहे. ही योजना पुढें आल्याबरोबर सध्यांचे शिक्षक 'तोबा तोबा' म्हणून आरडाओरड करतील यांत शंकाच नाहीं. याकरितां भावी पुणें–विश्वविद्यालयांतील शिक्षकांना योग्य त्या सवलती देऊन त्यांच्याकडून सहायक विषयांचा अभ्यास करून घेतला पाहिजे. तसें झाल्यावरच त्यांना कायम जागा मिळावी असा निर्बंध घालावा लागेल. शिक्षकांची तयारी नाहीं म्हणून जर शिक्षणाचा दर्जा वाढत नसेल तर अवश्य गुण असणारे शिक्षक बाहेरून आणण्यास कचरतां कामा नये.

स्थूल मानानें पाहतां पुणें–विश्वविद्यालयांत (१) पवित्रता, (२) कार्यक्षमता व (३) योग्य दर्जाचे शिक्षणक्रम ह्या तीन गोष्टी जर साध्य करतां आल्या, तरच त्याचा दर्जा वाढेल. उच्च दर्जा प्राप्त होण्याच्या आड विश्वविद्यालयाच्या बिलामध्यें म्हणजे घटनेमध्यें पुष्कळ गोष्टी प्रच्छन्न तऱ्हेनें राहिलेल्या आहेत. त्या गोष्टींनीं विश्वविद्यालयावर मात करूं नये असें जर वाटत असेल तर निदान वरील तीन गोष्टी

अंगीकारून त्यांचा पुरस्कार धडाडीनें केला गेला पाहिजे. पुण्याबाहेरील जोडलेलीं कॉलेजें ह्या गोष्टीस विरोध करतील असा संभव आहे. तरी सुद्धां पुणेंक्षेत्रांतील कॉलेजांच्या दृष्टीनें वरील मार्ग अंगीकारल्याशिवाय खऱ्या विश्वविद्यालयाची योग्यता पुणें–विश्वविद्यालयाला येणें अशक्य आहे. पहिल्या पदवी–परीक्षेनंतर वरच्या परीक्षा संशोधनकार्यावरच अवलंबून ठेवाव्या लागतील.

नवीन अभ्यासक्रमाच्या दृष्टीनें वर जीं उदाहरणें घेतलीं आहेत, तीं सर्व शास्त्रीय विषयांचीं घेतलेलीं आहेत. त्याचा अर्थ असा नव्हे कीं, ही अभ्यास-दिशा ‘आर्ट्स्’कडील विषयांस लावतां येणार नाहीं. उदाहरणार्थ, मराठी भाषा हा मुख्य विषय असल्यास त्या विषयाला संस्कृत, गुजराथी, हिंदी, कानडी व इंग्रजी ह्या भाषांचें ज्ञान पोषक होईल, आणि Philology हाहि विषय अवश्य सहायक होईल. इतिहास, अर्थशास्त्र, संस्कृत वगैरे विषयांबद्दलहि असेंच म्हणावें लागेल. तात्पर्य, अभ्यासक्रमासंबंधीं दृष्टिकोनच सर्वस्वीं बदलला पाहिजे. आशा आहे कीं, ने. ना. डॉ. जयकर हें घडवून आणतील.

———

## लंडनचा लॉर्ड मेयर

ब्रिटनमधील सार्वजनिक मानकऱ्यांमध्यें लंडनचे लॉर्ड मेयर यांचें स्थान एक अत्युच्च असून लोकांच्या मनांत त्या जागेविषयीं निःसीम आदरभाव आहे. गिल्डहॉल, मॅन्शन हाउस वगैरे ठिकाणीं दरवर्षीं होणारे लॉर्ड मेयर यांचे सार्व-जनिक समारंभ सुप्रसिद्ध असून त्या प्रसंगीं दिसून येणारा थाटमाट व वैभव इतकीं अवर्णनीय असतात कीं लोकांना त्यांचें एकाद्या इन्द्रसभेप्रमाणें किंवा गंधर्वनगरीप्रमाणें कौतुक वाटतें ! हा बाह्य भपका सोडून दिला तर लॉर्ड मेयर हें पद विभूषित करणाऱ्या व्यक्तीच्या मागें सार्वजनिक कार्यांचा व्याप व खर्च इतके अवाढव्य असतात कीं त्याला हा मानाचा मुकुट कांटेरीच वाटावयाला लागतो ! लॉर्ड मेयर या पदावर बसावयाला कोणते गुण लागतात याचें एका लॉर्ड मेयरनेंच असें वर्णन केलें आहे:—“First an iron constitution; secondly, an iron constitution and of course, a bottomless purse.”

किंग जॉनच्या वेळेपासून लंडनच्या लॉर्ड मेयरचें पद अस्तित्वांत आलें. या पदाचा पहिला मानकरी हेन्री फिट्झ एलविन हा ११९१ सालीं पहिला लॉर्ड मेयर झाला. लॉर्ड मेयरचा वार्षिक तनखा दहा हजार पौंड असून त्याचा विनि-योग त्या पदाप्रीत्यर्थ लागणाऱ्या खर्चाकडेच होतो. नमुन्यादाखल एकाद्या वर्षाच्या कामाचा आढावा घ्यावयाचा तर, लॉर्ड मेयर याला वर्षाकाठीं ३६५ सभा–समित्या घ्याव्या लागतात, १३० सार्वजनिक ‘भोजनसमारंभ’ करावे लाग-तात, ८५ स्वागतसमारंभ व नृत्यसमारंभ भरवावे लागतात, २० वेळां चर्चमध्यें समारंभानें जावें लागतें, ११०० सार्वजनिक भाषणें करावीं लागतात, पांच हजारांवर पत्रांचें टपाल उरकावें लागतें.

लॉर्ड मेयरच्या जागेचा मान इतका मोठा आहे कीं, त्या जागेवर निवडून आलेल्याला ती नाकारण्याचा मोह होणें शक्य नसतें. एकाद्यानें ही जागा नाकारली तर त्यास एक हजार पौंड दंड द्यावा लागतो ! लॉर्ड मेयर हा प्रिव्ही कौन्सिलचा पदसिद्ध सभासद असतो. शहरांतील सार्वजनिक समारंभांत त्याचा मान सर्वांच्यावर—राजपुत्रांच्याहि आधीं समजला जातो.

—‘My Lord Mayor,’
by William Kent.
(Times of India 26-3-48.)






# वाळूंतलीं फुलें

खलील जिब्रान [ अनुवादक : श्री. वि. स. खांडेकर ]

( रूपककथा व गद्यकाव्यें यांच्याप्रमाणेंच जिब्रानचीं सुभाषितेंहि मोठीं वैशिष्ट्यपूर्ण आहेत. एका काव्यात्म व चिंतनशील मनाचा हा विलास वाचकाला सहज मोहून टाकतो. या सुभाषितांची जन्मकथा जिब्रानची चरित्रलेखिका, बार्बरा यंग, हिनें मोठ्या मनोरंजक रीतीनें वर्णन केली आहे.

स्टूडिओमधल्या स्वैर गप्पांत आणि स्वच्छंदी संभाषणांत अनेक वेळां जिब्रानच्या तोंडांतून मोठ्या मार्मिक आणि सुंदर उक्ती बाहेर पडत. वेलीवर फुलें फुलावीं तशीं हीं सुभाषितें प्रकट होत असत. शिवाय स्टूडिओंत ठिकठिकाणीं कागदांच्या लहानसहान तुकड्यांवर अनेक वाक्यें लिहिलेलीं असत तीं निराळींच ! हे कागदाचे कपटे कुठेंहि पडलेले असायचे ! आपण तीं वाक्यें लिहिलीं आहेत याची जिब्रानला आठवणहि नसे. अशा या विखुरलेल्या सुंदर सूक्तींचें एक पुस्तक करावें असें बार्बराच्या मनांत आलें. जिब्रानानें या कल्पनेची प्रथम थट्टाच केली. तो हंसून म्हणाला, ‘ असलीं सटरफटर वाक्यें गोळा करून त्यांचें पुस्तक बनविण्याचा खटाटोप करण्यांत काय अर्थ आहे ? त्यांत कांहीं खऱ्या समुद्राचें दर्शन कुणाला होणार नाहीं. फक्त वाळू आणि फेंस तेवढा हाताला लागेल.’ लगेच बार्बरानें त्याच्या ह्या वाक्यांतले ‘ वाळू आणि फेंस ’ हे शब्द उचलून ‘ सँड ॲंड फोम ’ हें पुस्तकाचें नांव निश्चित केलें. हळूहळू जिब्रानलाहि या पुस्तकाच्या कल्पनेविषयीं थोडें आकर्षण वाटूं लागलें. थोड्याशा संकोचानेंच कां होईना, तो बार्बराला एकादा फाटका लिफाफा, सिगारेटच्या पेटींतल्या कार्डबोर्डाचा एकादा छोटा तुकडा किंवा एकाद्या नाटकगृहांतल्या कार्यक्रमाचा अर्धामुर्धा कागद देऊं लागला. या फाटक्या-तुटक्या कागदांच्या कोऱ्या बाजूंवर त्याचीं नवीं नवीं सुरस वचनें लिहिलेलीं असत. हे कागदाचे कपटे बार्बराच्या हवालीं करतांना तो नेहमीं तिला म्हणे, ‘ तूं वेड्यासारखा वाळू आणि फेंस गोळा करीत बसण्याचा उद्योग आरंभला आहेस ना ? ह्या घे तुला हव्या असलेल्या वस्तू ! ’ पुढें पुढें मात्र या प्रकारच्या लेखनांत त्याला गोडी वाटूं लागली. अनुभूति, कल्पकता आणि चिंतन यांच्या साहाय्यानें अत्यंत प्रभावी अशीं सुभाषितें निर्माण करण्यांत तो रमून जाऊं लागला.

बार्बरानें त्याच्या अशा पुष्कळ उक्ती एकत्रित करून त्यांची एक प्रत टंकमुद्रित केली आणि एके दिवशीं स्टूडिओंत जिब्रानच्या हातांत ती नेऊन ठेवली. तें हस्तलिखित चाळीत जिब्रान अर्धा तास अगदीं स्वस्थ बसला होता. नंतर त्यानें एकदम आपली मान वर केली आणि आश्चर्ययुक्त मुद्रेनें तिच्याकडे पाहत तो उद्गारला, ‘ हें सारें माझेंच लेखन आहे ? कां तूं

(‘ Sand and Foam ’ या जिब्रानच्या सूक्तिसंग्रहाच्या लवकरच प्रसिद्ध होणाऱ्या विवेचनयुक्त अनुवादांतून )








# आपलें आजारी राजकारण

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

[ मानसशास्त्र, मनोविकृतिविज्ञान व नीतिशास्त्र यांच्या दृष्टीनें केलेली मीमांसा ]

गेल्या कांहीं वर्षांतील, विशेषतः गेल्या कांहीं महिन्यांतील, या देशांत झालेल्या उत्पातांची मीमांसा करतांना प्रथमच एकदम असें ध्यानांत येतें कीं हा देश मानसिक आजारानें पीडिलेला आहे, दीर्घ मनोरोगानें ग्रस्त झालेला आहे. सामाजिक मानसशास्त्रदृष्ट्या याची परीक्षा व चिकित्सा केली पाहिजे. कारण हा देश मानसिक रोगानें पीडित आहे.

दहा वर्षांपूर्वी ब्रिटिश राजवटीच्या काळांत या देशाला दुबळा देश म्हणत असत, आजारी म्हणत नसत. परंतु त्या दुबळेपणांत आजारास कारणीभूत होणारा दोषसंचय भरपूर होत होता व म्हणूनच तो दुर्बल दिसत होता. दोषसंचय होऊन ऋतुपालट झाला म्हणजे संचित दोष प्रकुपित होऊन रोगचिन्हें बाहेर पडतात, तेव्हांच आजार झाला असें म्हणतात. हिंदुस्थान व महाराष्ट्र यांच्या राजकारणांत हीं आजाराचीं चिन्हें भरपूर दिसूं लागलीं आहेत. हा आजार मानसिक आहे, म्हणजे सामाजिक दृष्ट्या सांस्कृतिक आहे. हिंदुमुसलमानांची यादवी, गांधीवध, ब्राह्मण–ब्राह्मणेतर–विग्रह, व्यापाऱ्यांची जनभक्षक राक्षसी धनतृष्णा, दडपशाही करणारे कायदे, एकमेकांस चिरवैरी समजणारे राजकीय पक्षोपपक्ष–हीं सर्व, मानसिक रोगाच्या सांथीनें येथील संस्कृति ग्रासलेली आहे याचें निदर्शन करणारीं चिन्हें होत. या चिन्हांचें निदान सामाजिक मानसशास्त्रदृष्ट्याच केलें पाहिजे. कारण विवेकभ्रंश, बुद्धिवादाचा नाश आणि हीन वा उच्च भावनांना आणि विकारांना आवाहन देणारीं आणि क्षुब्ध करणारीं सामाजिक व राजकीय आंदोलनें हा सांस्कृतिक मनोव्याधींचीं निदर्शक चिन्हें होत. भावना कितीहि उच्च असोत, त्यांचें आंदोलन शांत विचारांच्या मर्यादेंत ठेविलें नाहीं तर अज्ञानाची वाढ होऊन व्यक्तींना व समाजांना त्या तथाकथित उच्च भावनांचा वारा संकटाच्या खडकावर आदळल्याशिवाय राहत नाहीं. म्हणून वैचारिक वातावरणाच्या अभावीं उत्पन्न झालेला उच्च भावनांचा अतिरेकहि सांस्कृतिक मनोव्याधीचेंच (Psychiatric) लक्षण होय.

## सांस्कृतिक भावनांचें मानसशास्त्र

सगळ्या सांस्कृतिक उच्च भावना (Cultural Sentimental Complex) अथवा सांस्कृतिक मूल्यें सहजप्रवृत्तींचीं (natural impulses चीं) परिणत रूपें होत. सहजप्रवृत्तींचा अथवा सांस्कृतिक भावनांचा क्षोभ सारखा होत गेल्यास, त्यांचा विरोध शमन न पावल्यास, मज्जातंतू क्षीण होऊन मज्जातंतूंत दोष उत्पन्न होतात. बुद्धि मनुष्यास मदत करून सहजप्रवृत्ती अथवा सांस्कृतिक भावना ह्यांचा क्षोभ व विरोध नष्ट करून त्यांचें शमन वा संवादित्व उत्पन्न करतें. उदाहरणार्थ, क्षुधा आणि प्रयत्नशीलता या सहजप्रवृत्ती होत.








बुद्धीच्या योगानें परिस्थितीचा आणि जीवनाचा अर्थ कळतो आणि तिच्या योगानें प्रयत्नांना योग्य मार्गदर्शन मिळून क्षुधेचें शमन होतें. अशा प्रयत्नांच्या योग्य मार्गदर्शनांत आर्थिक संस्कृति जन्मते. बुद्धि ही प्रयत्नांची आणि साधनांची निवड करते. वस्तूंचा संबंध पाहणें हें बुद्धीचें कार्य होय. व्यक्ति व परिस्थिति ( द्रष्टा व दृश्य ) यांच्यांत अनुरूपता, संवादित्व व सुसंगति निर्माण करणें, विसंगति व विरोध टाळणें हें बुद्धीचें कार्य आहे. हें बोधद्वारा बुद्धि घडविते. वस्तुस्थितीचें किंवा कार्यकारणभावाचें ज्ञान झाल्यावर सहज-प्रवृत्तींना वळण देऊन बुद्धि सुसंस्कृत प्रवृत्ति उत्पन्न करते. बुद्धि ही संस्कृतीची जननी आहे. ज्या प्रमाणांत ज्ञान वाढत जातें, निसर्गाचा आणि जीवनाचा वा आत्म्याचा अर्थ अधिकाधिक कळत जातो, त्या प्रमाणांत भावनांचें स्वरूप बदलत जातें.

धार्मिक वा नैतिक भावना देखील बुद्धि-जन्यच आहेत. पति, पत्नी, माता, पिता, पुत्र, गुरु, शिष्य इत्यादि नात्यांच्या भावना ज्ञानानें घडविल्या आहेत. उदाहरणार्थ, सहजप्रवृत्तीला म्हणजे कामवासनेला वाटेल ती स्त्री किंवा वाटेल तो पुरुष प्रिय दिसतो. बुद्धीनें दिलेला व्यापक अनुभव त्या सहजप्रवृत्तीचें म्हणजे कामवासनेचें रूपांतर करून पति व पत्नी हें नातें उत्पन्न करतो. सगळे सामाजिक वा नैतिक संबंध असेच निर्माण होत असतात. समुदायाची आवश्यकता असल्यामुळें समुदायप्रियता ही नैसर्गिक भावना अस्तित्वांत आहे. कुल, वंश, राष्ट्र इत्यादि भावना हीं बुद्धीनें त्या समुदायप्रियतेच्या नैसर्गिक भावनेला दिलेलीं रूपें होत.

सांस्कृतिक भावना बालपणापासूनच वाढीला लागतात. त्यांची घडण जरी प्रथम बुद्धीनें केलेली असली, तरी त्यांचा स्वीकार किंवा प्रसार बौद्धिक भूमिकेवरून बहुशः होत नसतो. सामुदायिक अनुकरणात्मक विचारानेंच त्यांचा स्वीकार वा प्रसार झालेला असतो. एक करतो म्हणून दुसरा करतो ही अंधानुकरण—प्रवृत्ति किंवा गतानुगतिकता पुष्कळशा सामाजिक परंपरा रूढ करण्यास कारण असते. ज्या सांस्कृतिक, धार्मिक किंवा नैतिक कल्पना मनांत दृढमूल झालेल्या असतात, परंतु ज्यांची उपपत्ति मात्र अज्ञात असते, त्या सर्वांचा प्रसार सामुदायिक अनुकरणरूप सहज-प्रवृत्तीमुळें किंवा गतानुगतिकतेमुळें झालेला असतो. त्यांची आवड अपार असते. त्यांच्या-वरील श्रद्धा गाढ असते. व्यक्तीच्या किंवा समाजाच्या जीवनाचें परिणत स्वरूप त्या कल्पनांमध्यें व्यक्त झालेलें असतें. अनुभवानें किंवा बुद्धीनें या मूल्यात्मक भावना किंवा कल्पना बदलण्याचें कार्य बाह्यतः स्थगित झालेलें असतें, तरी सुखदुःखात्मक अनुभव त्यांच्या नकळत फरक घडवून आणत असतो. बुद्धीचें कार्य प्रभावी व प्रकट रूपानें चालू असलेलें दिसत नसलें तरी ती संपूर्णपणें कुंठित झालेली नसते. म्हणून कालांतरानें लोकप्रवृत्तींत फरक झालेला दृष्टोत्पत्तीस येतो. ज्या समाजामध्यें वा राष्ट्रामध्यें बुद्धिप्रधान शिक्षण व बौद्धिक चळवळी यांना प्राधान्य नसतें, तेथें सांस्कृतिक मूल्यें श्रद्धारूढ असतात व गतानुगतिकतेच्या नियमानें दृढमूल झालेलीं असतात. हिंदुस्थान किंवा महाराष्ट्र यांतील सांस्कृतिक मूल्यें याच पद्धतीनें बनलीं आहेत.

## सांस्कृतिक मनोव्याधीची उपपत्ति

सामाजिक मानसशास्त्रहि व्यक्तींच्या मानस-शास्त्रावरच आधारलेलें असतें. कारण व्यक्तींना वगळून समाज म्हणून कांहीं शिल्लकच राहूं शकत नाहीं. म्हणून व्यक्तींच्या मनोव्याधींची मीमांसा आणि समाजमनोव्याधींची मीमांसा यांचें बहुतांशीं साम्यच आहे. त्यांतील बराच भाग व्यक्तिविषयक मानसशास्त्राचाच असतो. व्यक्ति-विषयक मनोव्यथेच्या कार्यकारणभावाचा एक नियम असा आहे कीं सतत प्रकटपणें किंवा अप्रकटपणें सुरू असलेला विरुद्ध भावनांचा झगडा निकाल न लागल्यास मज्जातंतूमध्यें क्षीणता उत्पन्न करतो. ही क्षीणता दीर्घकाल राहिली म्हणजे तींतून मज्जातंतूची विकृति (neurosis) निर्माण होते. ज्ञानाच्या योगानें जीव-नाला परिस्थित्यनुरूप वळण न मिळाल्यास हा असा







न शमणारा संग्राम सुरू होतो. व्यक्ति व परिस्थिति (द्रष्टा व दृश्य) यांचा संबंध अयथार्थ, विसंगत, हेत्वाभासपूर्ण किंवा असत्यमय झाला म्हणजे हा निर्णयशून्य झगडा उत्पन्न होतो. परिस्थितीच्या योग्य ज्ञानाची वाण हें त्याचें कारण होय. भावनांचा झगडा कित्येक वेळां सहजप्रवृत्ति आणि आणि सांस्कृतिक भावना यांच्यांत असतो. उदाहरणार्थ, काम-वासना विरुद्ध संयमाचा वा ब्रह्मचर्याचा आदर्श-या झगड्याचा निकाल योग्य तऱ्हेनें न लागल्यास मनोदौर्बल्य उत्पन्न होऊन लहानमोठीं मनोविकृतीचीं लक्षणें उत्पन्न होतात. कित्येक वेळां गुन्हेगारीची संवय, महापातकें, उन्माद, वेड (Psychosis) यांचाहि उगम होतो. भावनांचा झगडा भिन्न भिन्न सांस्कृतिक भावनांच्या मध्यें सुद्धां असतो. उदाहरणार्थ, सनातनी वेदशास्त्र-संपन्न पिता आपल्या मुलास इंग्रजी विद्या न शिकवितां वेदाध्ययन करावयास लावतो. कालांतरानें आपल्या बरोबरीची मित्रमंडळी आधुनिक विद्याविभूषित झालेली पाहून त्या मुलाचा ओढा आधुनिक विद्येकडे लागतो. परंतु परिस्थितीमुळें तें शिक्षण घेणें अशक्य झाल्यास, तो आहे त्या परिस्थितींत निमुटपणें राहतो. परंतु संवेदनक्षमता तीव्र असल्यास नवी संस्कृति आणि जुनी संस्कृति यांचा मनांत संग्राम होऊं लागतो आणि त्यांत चक्रमपणा वा वाह्यात्पणा उत्पन्न होतो; एकाद्यास वेडहि लागतें. ज्यांचे मज्जातंतू कणखर असतात, त्यांच्यांतील भावनांचा झगडा दडपला जातो; आपाततः त्याची विस्मृतीहि होते. कित्येक वेळां विरोधी भावनांपैकीं एका बाजूचा अतिरेक होऊन ती प्रभावी होते. ज्यांच्यांत एक बाजूच प्रधानता पावते असे एकांगी बनलेलेहि लोक पुष्कळ असतात. त्यांचा एक प्रकार म्हणजे सहजविकारास विवश असलेला स्वभाव (Impulse-ridden character)) आणि दुसरा प्रकार म्हणजे मूल्यभावना-विवश स्वभाव (Conscience-ridden character). ह्या दोन्ही स्वभावांचे लोक समाजांत कमीजास्त प्रमाणांत आढळतात. कित्येकांच्या ठिकाणीं या दोन स्वभावांचा एकत्र संकरहि झालेला असतो. विकारविवश स्वभावाच्या व्यक्तींत सहजप्रवृत्तींना वळण देणारी विचारशीलता कमी असते. धूम्रपान, मदिरासक्ति, वेश्यागमन इत्यादि व्यसनें असलेले रंगेल, चंगीभंगी, चोखंदळ, छांदिष्ट वा शोकीन लोक या प्रकारांत येतात. राजकारणाच्या परिसरांत, विकारविवश स्वभावांत नैसर्गिक आक्रमकप्रवृत्ति (aggressive impulse)--रूप विकाराची बाधा असलेले लोक बहुधा शिरतात. खेडेगांवांत यांना गांवगुंड म्हणतात. गांवगुंडी प्रवृत्तीला राजकारणाच्या सभ्य वेषांत पुष्कळच अवसर मिळतो. मूल्यभावनाविवश स्वभावाच्या व्यक्तींत धार्मिक, नैतिक किंवा सांस्कृतिक भावनेचा अभिनिवेश अतिरिक्त होतो. विवेचकतेचा, तत्त्वचिंतनाचा किंवा सर्वांगीण बौद्धिक संशोधकतेचा अभाव असलेल्या समाजांत असे अनेक लोक उत्पन्न होतात. कर्मठ, मंत्रचळया, नवशा, सोंवळ्या-ओंवळ्याचें स्तोम माजविणाऱ्या, उपासतापासांत गढलेल्या तरुण संन्याश्यांत या स्वभावाचा नमुना सांपडण्याचा पुष्कळ संभव असतो. विकार-विवशता व पवित्रभावना-विवशता यांचा उद्रेक कित्येकदां एकाच स्वरूपाचाहि दिसतो. बायकोचा खून करणारा आणि धर्माकरितां खून करणारा यांच्या भावनांचा उच्चांक एकाच रंगानें रंगलेला दिसून येतो. दुसरें असें कीं पवित्रभावना-विवश-स्वभाव विकारविवश स्वभावासहि निर्माण करतो. ब्राह्मणत्वाचा अहंभाव ब्राह्मणीसच पवित्र समजून इतर जातींच्या स्त्रियांस भोगार्थच संग्राह्य समजतो व त्यामुळें आत्मलिंगपूजक (Sexual Narcissus) बनतो. मुसलमानत्वानें अभिनिविष्ट स्वभाव हिंदूंच्या स्त्रियांस व हिंदुत्वाभिनिविष्ट स्वभाव मुसलमान स्त्रियांस भोगार्थच संग्राह्य मानतो व आत्मलिंगपूजक बनतो—आत्मलिंगास म्हणजे स्वजातीय किंवा स्वधर्मीय स्त्रीसच पवित्र मानणारा बनतो. अशाच प्रवृत्तीला पोषक अशा सामाजिक विकृतींत परजातींच्या, परधर्मीयांच्या व परराष्ट्रीयांच्या द्रव्याची अभिलाषा अपवित्र ठरत नाहीं; परजातीयांची, परधर्मीयांची व परराष्ट्रीयांची हिंसा,








त्यांच्या द्रव्याचा नाश, गृहदाह इत्यादि गुन्हे अपवित्र वाटत नाहींत; नव्हे, ते उलट पवित्रहि ठरतात !

## हिंदुस्थानांतील श्रद्धानिष्ठ संस्कृति व तिचे राजकारणावरील विपरीत परिणाम

हिंदुस्थानांतील हिंदुमुसलमानांची संस्कृति व सामाजिक संस्था यांची घडण श्रद्धेच्या पायावर झाली आहे. ही श्रद्धा संस्कृतीच्या अंगप्रत्यंगांत भिनली आहे. कांहीं पारमार्थिक व नैतिक तत्त्वें श्रद्धामय स्वरूपाचीं असणें ही गोष्ट वैज्ञानिक संस्कृतींतहि पुष्कळांच्या बाबतींत अपरिहार्य असते. परंतु सगळाच व्यवहार, आहार, विहार इत्यादि जीवनाच्या किरकोळ बाबी सुद्धां परंपरेच्या श्रद्धेनें चालणें हें ह्या संस्कृतीचें वैशिष्ट्य आहे. त्यामुळें बुद्धिपुरःसरतेचा अभाव आणि मौर्ख्यपूर्ण अंधश्रद्धा यांच्या योगानें जीवनक्रम अंधळ्या कोशिंबिरीच्या खेळाप्रमाणें या संस्कृतींत झालेला आहे. आधुनिक राजकीय चळवळी या मूलतः बौद्धिक चळवळी आहेत. त्यांना सुद्धां या संस्कृतींत धार्मिक चळवळीचें रूप येऊन परंपरागत अंधश्रद्धेचा गडद रंग चढतो व त्यांची विशुद्धता नष्ट होऊन विकृति उत्पन्न होते; किंबहुना ती त्यांची प्रेरक शक्ति बनते. देशांतील अनेक प्रमुख राजकीय पक्षांत अथवा राष्ट्रीय स्वयंसेवकसंघाच्या सारख्या चळवळींतच नव्हे, तर अद्ययावत् विचारसरणीचे म्हणून मानलेले कम्युनिस्ट व समाजवादी पक्ष यांच्यांतील कार्यकर्त्यांत सुद्धां वैज्ञानिक दृष्टिकोन, बुद्धिवाद, तदंगभूत औदार्य व परमतसहिष्णुता यांचा अभाव दिसतो. याचें कारण बौद्धिक चळवळीच्या शैक्षणिक प्रवृत्तींनीं भारलेल्या वातावरणाचा अभाव होय. म्हणून त्यांच्या चळवळीचीं स्फुरणें धार्मिक संप्रदायाच्या एकांतिक, कडव्या व सोंवळया स्वरूपाचीं दिसतात. जुनी संस्कृति व नव्या चळवळी यांच्यांतील मनोभूमिका परस्परविरोधी असतात. बौद्धिक वातावरणाच्या अभावामुळें हा विरोध कित्येक वेळां अप्रकटपणें तसाच राहतो, दडपला जातो, परंतु नष्ट मात्र होत नाहीं. म्हणून तो अनुकूल संधि मिळाल्याबरोबर उघडा होतो आणि दुर्दम स्वरूप धारण करतो. वैचारिक किंवा बुद्धिवादी चळवळींचा राजकीय वा सामाजिक चळवळीला जेथें व जेव्हां पाठिंबा असतो तेथें व तेव्हां परंपरागत श्रद्धारूढ भावनांचें अंधत्व लोकांना समजूं लागून परंपरागत संस्कृति आपलें स्वरूप बदलून टाकते आणि नव्या राजकीय व सामाजिक चळवळींनीं दर्शित केलेल्या जीवनक्रमाशीं सुसंगतपणा निर्माण करते. हिंदुस्थानांतील राजकीय व सामाजिक चळवळींना बौद्धिक चळवळीचें पाठबळ न मिळाल्यामुळें परंपरेच्या भावनांचा विरोध कांहीं काळपर्यंत जरी दडपला गेला, तरी त्यांची अप्रत्यक्षपणें वाढच झाली व अनुकूल वातावरण मिळाल्याबरोबर त्यानें उग्र व निर्घृण स्वरूप प्रकट केलें. विरोधांना वगल देणाऱ्या चळवळी निर्माण झाल्या; विरोधांचा अर्थ समजून घेऊन त्यांना निकालांत काढणाऱ्या, अभिनिवेशाचा वाराहि नसलेल्या व आग्रहशून्य मतपरिवर्तनाची महती समजलेल्या चळवळी वाढीस लागल्या नाहींत. मधूनमधून डोकावूं पाहणारे हिंदुमुसलमानांचे वा ब्राह्मण—ब्राह्मणेतरांचे विरोध परकीय सत्तेच्या निमित्तानें निर्माण झाले आहेत अशी मिथ्या समजूत करून घेऊन ते स्वराज्यांत आपोआप नष्ट होतील असा भ्रम पसरविण्यांत आला. वस्तुतः तेव्हां हिंदुस्थान ज्या नव्या राजकीय व सामाजिक वातावरणांत प्रवेश करीत होता त्या वातावरणाशीं पुरातन संस्कृतीचे पिंड विसंगत प्रकृतीचे होते. त्या वातावरणास ब्रिटिश राज्यसत्ता केवळ निमित्तमात्र होती. या नव्या राजकीय व सामाजिक परिस्थितीशीं विसंगत अशाच त्या पुरातन संस्कृतीच्या मूल्यभावना व तत्संबद्ध संस्था होत्या. हें वातावरण जागतिक स्वरूपाचें होतें. हें सर्व आपणांस ओळखतां आलें नाहीं. व्यक्तिस्वातंत्र्य, मानवी समता ( केवळ राष्ट्रीय समता नव्हे ) व बंधुभाव या नैतिक मूल्यांवर आणि बुद्धिवादावर अधिष्ठित अशा लोकसत्तेशीं विसंगत असलेल्या मूल्यांनीं भरलेल्या या दोन धर्मसंस्कृती ( हिंदुत्व व मुसलमानत्व ) या देशांत नांदत असल्यामुळें व नव्या परिस्थितीस अनुरूप असें वळण त्यांना








न मिळाल्यामुळें, सत्तासंक्रमणाच्या काळांत भावनांच्या विरोधांना अकाळविकाळ स्वरूप आलें.

## निरामय सांस्कृतिक परिवर्तनास बौद्धिक चळवळीची गरज

वस्तुतः परंपरागत संस्कृतीचा समूळ नाश करून नवसंस्कृति जन्मत नसते. संस्कृतींमधील बदल झटिति घडणाऱ्या क्रांतीच्या स्वरूपाचा कधींहि असूं शकत नाहीं. राजकीय व आर्थिक क्रांति झाली म्हणजे ती अनुषंगानेंच आपल्या बरोबर तितक्याच त्वरित गतीनें सांस्कृतिक क्रांतीहि करते, ही समाजवाद्यांनीं चालविलेली केवळ आत्मवंचना आहे. उदाहरणार्थ, कम्युनिझमनें—रशियन–सांस्कृतिक–राष्ट्रीय–परंपरेनें दूषित—असा संकुचित बोल्शेविझम् उत्पन्न झाला. समाजवादानें जर्मनींत व इटलींत–परंपरागत संकुचित संस्कृतीनें दूषित असा–राष्ट्रीय समाजवाद उत्पन्न झाला, त्यासच फॅसिझम् म्हणतात. लोकसत्तावाद देखील असाच ब्रिटिश व फ्रेंच यांच्या सांस्कृतिक संकुचित परंपरेनें पूर्वी दूषित झाला होता. असें होण्याचें कारण असें कीं, आर्थिक परिस्थितीचे व राजकारणाचे परिणाम जितके उत्तान असतात, तितके संस्कृतीचे नसतात. संस्कृति मनुष्याच्या आत्म्यांत खोल शिरलेली असते. बुद्धि अथवा बोध हा आत्म्याचा मूलस्वभाव आहे. त्या बोधांत फरक झाला म्हणजे संस्कृति बदलूं लागते. मूल्यभावना—हीं संस्कृतीचीं आध्यात्मिक मुळें होत. बोधामुळें त्यांच्यांत बदल होऊं लागतो. बुद्धीनें मूल्यभावनांचें संशोधन करणें हें बौद्धिक म्हणजे शैक्षणिक चळवळीचें कार्य आहे; अशी चळवळ न झाल्यामुळें सांस्कृतिक अधःपात ा दर्शक असा भावनांचा संग्राम भारतीय जीवनांत शिरला आहे.

## हिंदी राजकारणांतील विरोधी मूल्यभावनांच्या संकराचें अनिष्ट पर्यवसान

मूल्यभावना या सहजप्रवृत्तींच्या आधारावर उभारलेल्या असतात. सहजप्रवृत्तींचें रूपांतर म्हणजे मूल्यभावना होत. नैतिक व पारलौकिक भावनांप्रमाणेंच हिंदुत्व, मुसलमानत्व, ब्राह्मणत्व, ब्राह्मणेतरत्व या संमिश्र मूल्यभावना (Value-complexes) होत. हीं अहंकाराचीं स्वरूपें होत. हिंदुत्व, मुसलमानत्व इत्यादि रूपें धारण करून मनुष्याचा अहंकार त्या त्या सामाजिक परिस्थितींत वावरत असतो. हिंदुत्व, मुसलमानत्व, ब्राह्मणत्व हें सामाजिक व्यवस्थेचें व संस्कृतीचेंहि स्वरूप आहे. जोंपर्यंत विशिष्ट अहंकार हा विशिष्ट सामाजिक व सांस्कृतिक परिस्थितीशीं अनुरूप अशा स्वरूपाचा घडलेला असतो, तोंपर्यंत त्या अहंकारानें युक्त अशा जीवनाचा योगक्षेम चांगला चालतो. त्यामुळें ती अहंता बाधक न होतां साधक होते. धार्मिक, सांस्कृतिक, राजकीय व सामाजिक ध्येयें या अहंकारावर आधारलेलीं असतात. जेव्हां नव्या संस्कृतीची, राजकारणाची व सामाजिक संस्थांची गरज उत्पन्न होते, तेव्हां जुन्या परंपरागत ध्येयांचें स्थान नवीं ध्येयें घेतात. परंतु नव्या ध्येयांना अनुरूप असा तो अहंकार नसतो. त्या जुन्या अहंकाराची व त्या जुन्या ध्येयांची एकमेकांच्यामुळें गैरसोय होते. म्हणून त्यांची अव्यवस्थित गल्लत होऊं लागते. हिंदुस्थानांत राष्ट्रीयत्वाचें नवें ध्येय आलें तेव्हां तें हिंदुधर्माच्या भावनेनें भारलें जाऊं लागलें. स्वामी विवेकानंद, अरविंद घोष, महाराष्ट्रीय व बंगाली दहशतवादी क्रांतिकारक, टिळक इत्यादिकांची राष्ट्रीयता हिंदुधर्माच्या मूल्यांनीं भरून गेली. हिंदूंच्या राष्ट्रीयत्वाचा नव्या भारतीय युद्धाला प्रोत्साहन देणारा तत्त्वज्ञानात्मक प्राण भगवद्गीता बनला. परंतु तेंच राष्ट्रीयत्व मुसलमान इत्यादिकांना सुद्धां व्यापून बसूं लागलें; तें राष्ट्रीयत्व मुसलमानांच्या आत्म्यांवर मुसलमानत्वानें भारलें जाऊं लागलें. आणि याचा अंतिम परिणाम असा झाला कीं, राष्ट्रीयत्वाचें राजकीय फल प्राप्त होण्याच्या वेळीं त्या राष्ट्रीयत्वांतील अंतर्विरोध संपूर्णपणें प्रकट झाला. हिंदूचें राष्ट्रीयत्व मुसलमानाला त्याच्या जीवनक्रमाच्या स्वास्थ्याचें व अभयाचें आश्वासन देईनासें झालें. तें राष्ट्रीयत्व लोकसत्तात्मक नव्या जीवनक्रमाचें शुद्ध निदर्शक नव्हतें, म्हणून तें मुसलमानांना बदलूं शकलें नाहीं. परकीय सत्तेचा नाश हा त्याचा भाग सर्वांना पटला; पण लोकसत्तेच्या नव्या संस्कृतीचें सर्वधर्मीयांना घेऊन










अनुक्रमणिका

चालणारें नवजीवन त्या राष्ट्रीयत्वांत स्पष्टपणें प्रतीत झालें नाहीं. सांगणें निराळें आणि प्रत्यय येणें हें निराळें; प्रत्यय न आल्यामुळें हिंदुत्व व मुसलमानत्व यांना दुय्यम स्थान नव्या ध्येय-वादाच्या चळवळी देऊं शकल्या नाहींत. परंपरे-प्रमाणें हिंदुत्व व मुसलमानत्व या धार्मिक भावना एका अत्यंत भिन्न सामाजिक संस्कृतीच्या निदर्शक आहेत. त्यांच्यापेक्षां अधिक उच्च व जीवनहेतूचें साफल्य करणारें ध्येय राष्ट्रीयत्वांत दिसलें नाहीं, एकराष्ट्रीयत्वांतहि दिसलें नाहीं. एकराष्ट्रीयत्व हें शिथिल रूपानें उत्पन्न झालें. त्यामुळें सत्तांतर होण्याच्या वेळीं आणि तदनंतर राष्ट्रीयत्वापेक्षां अधिक दृढमूल अशा परं-परागत संस्कृतीच्या अंधभावनांनीं माणसांच्या आत्म्यावर पूर्ण ताबा मिळविला. मुसलमानत्व व हिंदुत्व या मूल्य–भावनांचा अभिनिवेश चढून धर्मयुद्ध निर्माण झालें. त्या भावनांनीं सर्व विवेक नष्ट केला. कारण बुद्धिवादानेंच विवेक जागृत राहतो आणि श्रद्धेचें अंधत्व नष्ट करतो.

आजपर्यंत राजकीय चळवळींची देशी परंपरा पवित्र भावना जागृत करण्यावरच कायम केंद्रित झालेली आहे. तिच्यांत लोकांना विचार करा-वयास शिकविलें जात नाहीं. प्रचारकीय तंत्र सांप्र-दायिक पद्धतीचें असतें. जनतेंत उत्साह उत्पन्न केला जातो, तिचा उठाव होतो. त्याचा परिणाम संमिश्र मूल्यभावना आणि नैसर्गिक सहजप्रवृत्ती यांचा समुच्चित उद्रेक होऊन व सामुदायिक उन्माद (Mass Hysteria) उत्पन्न होऊन जनता वाटेल तें करण्यास प्रवृत्त होते. भावनाविवश स्वभावाची ही परिणति होय. या समयीं ती भावनाविवशता परंपरागत हिंदुत्वाच्या व मुसल-मानत्वाच्या पावित्र्यानें भारली जाऊन तिनें माणुसकीच्या दृष्टीनें अत्यंत अपवित्र कार्य सुरू केलें. मूल्यभावनाविवश व विकारविवश स्वभा-वांच्या लोकांचा भरणा राजकीय चळवळींमध्यें अगोदरच झालेला होता. त्यांच्या हिंदुत्वाचें व मुसलमानत्वाचें मूळ फाजील स्वरूप प्रकट होऊन घोर कृत्यांस प्रारंभ झाला. गांधीवधानें त्या कृत्यांची परिसीमा गांठली! जगाच्या इतिहासांत या घोर कृत्याला तोड नाहीं. या घोर कृत्यानें धर्मसंस्थेच्या व राष्ट्रीयत्वाच्या अंतरंगांतील दोष उघड केले. सर्वंकष राष्ट्रीयत्व हें मानव्यविरोधी कसें आहे हें यामुळें निश्चित झालें.

## महाराष्ट्रांतील ब्राह्मणब्राह्मणेतरवादाच्या मुळाशीं सामाजिक सामरस्याचा अभाव

महाराष्ट्रांतील गांधीवधानंतर झालेल्या जाळ-पोळींचें व अत्याचारांचें कारण महाराष्ट्रांतील ब्राह्मण–ब्राह्मणेतरवादाची परंपरा होय. राष्ट्रीय-त्वाच्या वरपांगीपणाचें व शैथिल्याचें त्यामुळें निदर्शन मिळालें. ब्राह्मण–ब्राह्मणेतरवाद १९३० सालापासून कांहीं काळ दबला गेला होता, तो सत्तासंक्रमणाच्या वेळीं प्रकट झाला आणि गांधी-वधाच्या निमित्तानें त्यानें पेट घेतला. दीर्घ काल चालू असलेल्या हृदयांतील ज्वलनानेंच ब्राह्मणां-च्या घरांवर पेट घेतला.

ब्राह्मणेतरांच्या हृदयांतील ज्वलनास महाराष्ट्रां-तील जातिभेदाची दाहक ऐतिहासिक परंपरा कारण होय. ब्राह्मणजमातीचें धार्मिक जिव्हा-ळ्याचें नातें गेल्या दीडशें वर्षांच्या काळांत पार तुटून गेलें. ब्राह्मण हा शिक्षण, अधिकार व सांसारिक सुस्थिति या बाबतींत इतरांच्या मानानें पुढें गेला. ब्राह्मण्याचा अहंभाव व सांस्कृतिक प्रगति यांच्या योगानें महाराष्ट्रांतील सामाजिक जीवनांत तो युरोपांतील ज्यूंप्रमाणें अलग दिसूं लागला व शल्यवत् सलूं लागला. मोठमोठ्या टोलेजंग शिक्षणसंस्था आणि अधिकार यांच्यांत ब्राह्मणेतर जनतेस संपूर्णपणें भागीदार बनविण्या-च्या बाबतींत कष्ट करण्याचें सोडून देऊन ब्राह्मणांनीं इंग्रजी राज्याच्या विरोधी बंड उभ-विण्याचे कष्ट मात्र खूप घेतले व त्यांतहि मोठेपणा मिळविला. त्यामुळें जातीय अहंभावास खूप मोठी मस्ती आली. त्यामुळें राष्ट्रीय एकी तकला-दीच राहिली. तात्पर्य, ब्राह्मण व ब्राह्मणेतर, स्पृश्य व स्पृश्येतर, यांच्यांत सामाजिक जीवनाची समरसता आज मुळींच दिसत नाहीं. मध्ययुगीन ग्रामीण जीवन व मानसिक वातावरण यांचें मूल्य गेल्या दीडशें वर्षांत नष्ट झाल्यामुळें ब्राह्मण-










ब्राह्मणेतर किंवा स्पृश्य–स्पृश्येतर यांच्या गृहसंस्कृतींतील जातिभेदानें निर्माण केलेलें अंतर युरोपांतील व अमेरिकेंतील भिन्नराष्ट्रीयांच्या गृहजीवनांतील अंतरापेक्षां खोल व दीर्घ आहे हें एकमेकांच्या प्रत्ययास येत आहे. ब्राह्मणी गृहसंस्था, मराठे, माळी व तत्सम यांची गृहसंस्था व अस्पृश्यांची गृहसंस्था, या सर्व एकमेकींपासून इतक्या दूर आहेत कीं त्यांत कित्येक शांत (पॅसिफिक) महासागर मावतील ! तात्पर्य, महाराष्ट्रीयांच्या सामाजिक जीवनांत समरसतेचा पूर्ण अभाव आहे.

ज्या समाजांतील भिन्नभिन्न वर्ग व जातीजमाती यांचें सामरस्य नष्ट झालेलें असतें, तेथें सामाजिक यादवींचीं भुतें व पिशाच्चें निरंतर वास करीत असतात. त्यांतूनच निमित्त सांपडतांच ब्रह्मराक्षस व आगे वेताळ बाहेर प्रकट होऊन त्यांचें श्मशान-नृत्य सुरू होतें. या पिशाच्चांचें व राक्षसांचें खरें निवासस्थान वंश, जाति, वर्ग, राष्ट्र, संस्कृति इत्यादि भेदांनीं बनविलेला ब्राह्मणत्व, हिंदुत्व, राष्ट्रीयत्व इत्यादि स्वरूपांचा अहंभाव होय.

## सामाजिक समरसतेस आवश्यक नैतिक व बौद्धिक अधिष्ठान

हे भेद जेव्हां नैतिक अधिष्ठानावर सर्वजीवनोपकारक म्हणून अस्तित्वांत येतात, तेव्हां भेदजन्य अहंभाव ‘सूत्रे मणिगणा इव’ या न्यायानें सर्व मानवांच्या कल्याणरूपी सूत्रांत ओंवले गेल्यामुळें सामाजिक समरसतेस बाधक होत नाहींत. हिंदूंचें हिंदुत्व, ब्राह्मणांचें ब्राह्मणत्व आणि मुसलमानांचें मुसलमानत्व हे भाव नैतिक अधिष्ठानावर अधिष्ठित नसल्यामुळें ते अहिनकुलवत् वैराच्या संबंधांत परिणत झाले आहेत. जागतिक राजकारणांतहि राष्ट्रीयत्व हा भाव असाच बनला आहे. राष्ट्रीयत्वानें धर्म व देव यांना पदच्युत करून त्यांचें सिंहासन बळकाविलें आहे.

ब्राह्मणत्व, ब्राह्मणेतरत्व इत्यादि जातिभेद, हिंदुत्व, मुसलमानत्व इत्यादि संस्कृति–भेद किंवा धर्मभेद व हिंद, पाकिस्तान, फ्रान्स, जर्मनी, सोव्हिएट जन्मभूमि, अमेरिका इत्यादि राष्ट्रीयत्व–भेद हे भाव (Value-Complexes) मनुष्यजातीचे शाप बनले आहेत. कारण ते मानवी जीवनाच्या सुव्यवस्थेचे दर्शक राहिलेले नाहींत; म्हणजेच ते नैतिक अधिष्ठानावर आधारलेले नाहींत. त्यामुळें त्यांचा ओढा सांस्कृतिक अधःपाताचें स्थान असलेल्या अविद्येच्या अपार अंधतमानें भरलेल्या गर्तेकडे निःसंशय वाढूं लागला आहे.

हल्लींच्या भारतीय संस्कृतींत सामाजिक जीवनाच्या नैतिक अधिष्ठानाच्या जाणिवेचा अभाव आहे. म्हणून सामाजिक समरसता नष्ट झाली आहे. नैतिक अधिष्ठान म्हणजे नैतिक श्रद्धा. श्रद्धा हें जाणिवेचें अगाध, मधुर व मंगल रूप होय. सत्याची उत्कट अभिरुचि व चित्ताची प्रसन्नता हीं श्रद्धेचीं लक्षणें आहेत. चित्ताची प्रसन्नता ज्ञानाच्या वाढीनेंच वाढत असते. भिन्नभिन्न वस्तूंचे संबंध जाणणें हेंच ज्ञानाचें स्वरूप होय. बुद्धीच्या योगानें मूल्य–भावनांच्या आणि सहज-प्रवृत्तींच्या मर्यादा लक्षांत येतात. नीति म्हणजे मानवी जीवनाच्या विकासाचे नियम होत. ते नियम हिंदुत्व, मुसलमानत्व, राष्ट्रीयत्व यांच्यापेक्षां फारच व्यापक असतात. सर्व मानवी जीवन हें त्यांचें क्षेत्र आहे. ब्राह्मणत्व, हिंदुत्व, मुसलमानत्व, राष्ट्रीयत्व यांचें मर्यादित स्वरूप नीतीच्या ज्ञानानेंच उघडकीस येतें. त्यांची उपकारक शक्ति जशी नैतिक जाणिवेनें कळते, त्याचप्रमाणें त्यांच्या अपकारक स्वरूपाचें आकलनहि नैतिक विचारानेंच होतें. कारण, सगळे व्यक्तिसंबंध व सामाजिक व्यवहार यांचें कार्य सज्जन––चांगला माणूस––बनविणें हें आहे. हिंदु, मुसलमान, ब्राह्मण, ब्राह्मणेतर, हिंदी, चिनी, फ्रेंच, ब्रिटिश इत्यादिकांची योग्यता सज्जन हें विशेषण लावूनच पारखतां येते. चांगला ब्राह्मण, चांगला हिंदु, चांगला मुसलमान, चांगला हिंदी माणूस, चांगला फ्रेंच व चांगला ब्रिटिश म्हणून जो म्हटला जातो तो जर सज्जन किंवा चांगला माणूस नसेल तर तो कोणत्याहि दृष्टीनें चांगला नव्हे, हेंच सर्व धर्मांचें व शास्त्रांचें सार आहे. नेमक्या याच










विचाराचा अभाव आपल्या राष्ट्रांत आहे. हें नैतिक श्रद्धेनें समजतें. पण येवढें मात्र येथें ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं, नैतिक श्रद्धेला बुद्धिवादाची जोड नसल्यास ती संकुचित व विस्तृत अशा विविध भावनांच्या गुंतागुंतीचें व परिणामांचें आगाऊ आकलन करूं शकत नाहीं. म्हणून बुद्धिवादाशीं समरस झालेली नैतिक श्रद्धा आणि श्रद्धेला सत्याच्या स्वरूपाचा साक्षात्कार व्हावयास मदत करणारा बुद्धिवाद यांची आवश्यकता आहे.

## व्यापक नीति, बुद्धिवाद व मानव्य यांचा मनास निरामय करणारा संगम

हल्लीं कष्ट, त्याग, तप, सेवा, लढा, बलिदान इत्यादि श्रद्धाश्रित कल्पनांची महती वाढली आहे. त्यांचा संबंध मूल्यभावनांशीं असतो. वर्ग, राष्ट्र, हिंदुत्व, मुसलमानत्व, ब्राह्मणेतरत्व, अस्पृश्यत्व, ब्राह्मणत्व इत्यादि संमिश्र मूल्यभावनांना हृदयांत अमर्याद महत्त्व देणारे व त्या भावनांनीं अभिनिविष्ट झालेले असे दोन्ही प्रकारचे भावनाविवश आणि विकारविवश लोक राजकारणांत शिरले आहेत. त्यामुळें स्वमूल्यां(Cultural Values)च्या उद्धारार्थ 'ब' व्यक्तींनीं केलेला संग्राम 'अ' व्यक्तींच्या दृष्टीनें अत्याचार वा आक्रमण ठरतो. 'ब' व्यक्तींचा त्याग, त्यांचें तप वा त्यांचें बलिदान हें 'अ' व्यक्तींच्या दृष्टीनें आततायीपणा ठरतें. बुद्धिवाद संमिश्र मूल्यभावनांच्या नैतिक मर्यादा ओळखूं शकतो. त्याचा अभाव असल्यामुळें विकारवश गुंड त्यागी वीर ठरतात; आणि मूल्यभावनाविवश व्यक्ती तपस्वी गुरू ठरतात. 'लढा' या कल्पनेला हल्लींच्या राजकारणांत वरिष्ठ मूल्य आलें आहे. हें वरिष्ठ मूल्य सामाजिक मनांत दडलेल्या विसंगत भावनांच्या न मिटणाऱ्या विग्रहाचें बाह्यात्कारी उज्ज्वल रूप आहे. तें विसंगत भावनांच्या क्षोभानें तयार झालेल्या मज्जातंतूंच्या विकृतीचें उज्ज्वल सोंग आहे. मनाच्या व्याधीची परमावधि म्हणजे हा लढा आहे. वस्तुतः लढा हा श्रेष्ठ मूल्य कधींच असतां कामा नये. तो एक अपरिहार्य असा अपवादात्मक उपाय आहे, असें बुद्धिवादी नीतिशास्त्र सांगतें. देश, काल, पात्र इत्यादि ओळखून शुद्ध व व्यापक नीतितत्त्वाची कसोटी लावूनच त्याग, तप, सेवा, लढा, बलिदान व आत्मयज्ञ यांना धर्म्य वा अधर्म्य, कर्तव्य वा अकर्तव्य किंवा युक्त वा अयुक्त अशा स्वरूपाच्या मर्यादा घालतां येतात. बुद्धिवादच या मर्यादांचा प्रकाशक असतो.

बुद्धिवादाचा अधिकारी मनुष्यमात्र होय. हिंदु बुद्धिवाद व मुसलमान बुद्धिवाद म्हणून कांहीं नाहीं. अशासारखे शब्द हास्यास्पद व बुद्धिमांद्याचे दर्शकच ठरतील. बुद्धिवादाचा अधिकारी हाच नैतिक विवेकाचा अधिकारी होय. तो म्हणजे मनुष्य. मानव्य हेंच बुद्धिवादाचें व नैतिकतेचें केंद्र, सार व आदर्श होय. मानव्याच्या विरोधी असलेल्या सामाजिक संस्था अनैतिक होत. त्या संस्था विशिष्ट मानवी गटाला वा समुदायाला तात्पुरत्या हितप्रद ठरल्या तरी त्या नरकाचें द्वारच असतात. म्हणून सर्व मानवव्यापी नैतिक मूल्यांना बाधक अशा जातिभेद, धर्मभेद, संस्कृतिभेद, राष्ट्रभेद, खंडभेद या भावनांबाबत खबरदारी घेऊन त्यांची शुद्धि केली पाहिजे. ती केली नाहीं तर हिंदी व महाराष्ट्रीय राजकारण सध्यां जडलेल्या महाव्याधींतून मुक्त होणार नाहीं.

---

# सेवाग्राम व अंबरनाथ

श्री. ह. कृ. मोहनी

फेब्रुवारीमध्यें भरविण्यांत आलेल्या सेवाग्रामच्या विधायक कार्यकर्त्यांच्या संमेलनांत गांधीजींच्या तत्त्वज्ञानावर व कार्यपद्धतीवर निष्ठा ठेवणारे हिंदुस्थानभरचे जवळजवळ एक हजार कार्यकर्ते एकत्रित झालेले होते. संघटित दृष्टया गांधीजींची परंपरा पुढें चालविण्याची जबाबदारी व्यक्तिशः प्रत्येक कार्यकर्त्यास जाणवत असली तरी, गांधीजींच्या असामान्य अवतारी व्यक्तित्वामुळें आणि प्रत्येक युगपुरुषामध्यें अंतर्भूत झालेल्या लोकविलक्षण प्रकृतिमत्त्वामुळें व्यक्तिशः व संघदृष्टया आपण गांधीजींची जागा अल्पांशानें देखील भरून काढूं शकतों असा आत्मप्रत्यय ह्या सेवाग्रामच्या संमेलनांत दृग्गोचर होऊं शकत नव्हता; आणि म्हणूनच सर्वोदय–समाजाचा केवळ ध्येयवादी, अत्यंत विरळ व अमूर्त असा ठराव आणि गांधीवादी लोकांचा कुंभमेळ्यासारखा वार्षिक श्राद्धदिनाच्या दिवशीं भरविण्यांत येणारा मेळावा, येवढेंच ह्या सेवाग्रामच्या संमेलनाचें पर्यवसान दिसून आलेलें आहे.

## सेवाग्रामसंमेलनाची सावधगिरी

ही संमेलनाची फलश्रुति उत्साह उत्पन्न करणारी व समाधानकारक नाहीं, हें खरें आहे; तथापि गांधीजींच्या मृत्यूनंतर ताबडतोब त्यांची जागा भरून निघेल अशी आशा करणेंहि चुकीचेंच आहे. अशी अपेक्षा करणें म्हणजे गांधीजींचें असामान्यत्व न ओळखण्यासारखें ठरेल. गांधीजींचा प्रत्येक गुण जरी धर्मसाधना करणाऱ्या सामान्य मनुष्यांच्या आटोक्याबाहेरचा नसला व गांधीजींची गुणसंवर्धनाबाबतची अटोकाट व सतत तपश्चर्याहि अशा धर्मप्रवण सामान्य मनुष्यांच्या सामर्थ्याबाहेरची नसली, तरी ह्या गुणांच्या समुच्चयानें घडून आलेलें कार्य मात्र कोणत्याहि सामान्य मनुष्याच्या कक्षेबाहेरचें आहे. 'The King is dead; long live the King' ह्या वाक्यांतील विधान गांधीजींच्या बाबतींत केव्हांहि लागू होण्यासारखें नाहीं सामान्यांच्या कार्यशक्तींचें तर राहूंच द्या, पण असामान्य पुरुषांच्याहि कार्यकर्तृत्वाचा इतिहास लक्षांत घेतला तरी गांधीजींच्या असामान्यत्वाची तुलना दुसऱ्या कोणत्याहि असामान्य पुरुषाशीं होऊं शकणार नाहीं, असें म्हटल्यास त्यांत मुळींच अतिशयोक्ति नाहीं.

गांधीजींनीं पन्नास वर्षें अहर्निश झटून जगाच्या आरंभापासून मानवी समाजांत हजारों वर्षें चालू असलेल्या रक्तरंजित युद्धास नैतिक प्रतिकाराचा, सत्याग्रहाचा, सविनय कायदेभंगाचा पर्याय शोधून काढण्याचें दिव्य कार्य केलें आहे. 'War is a biological necessity' हा अबाधित समजला जाणारा सिद्धान्त, हिंदुस्थाननें परजलेल्या सत्याग्रह–शस्त्रामुळें थोडा तरी डळमळीत केलेला आहे, हें गांधीजींचे शत्रू कबूल करणार नसले, तरी जगांतील सत्प्रवृत्त विचारी लोक मान्य करूं शकतील इतकें युगकार्य गांधींनीं करून दाखविलेलें आहे व शांततावादी लोकांच्या








मनांत एक नवीन उज्ज्वल व दिव्य आशा उत्पन्न केली आहे.

गांधीजींच्या या कार्याबद्दल आदर बाळगणाऱ्या व त्यांची विचारसरणी मान्य करून तीस आपल्याकडून होईल तितका हातभार लावणाऱ्या कार्यकर्त्यांवर गांधीजींची उज्ज्वल परंपरा, त्यांचें अवतारी कार्य व त्यांची जग उलटविणारी विचारधारा पुढें चालविण्याची जबाबदारी इतक्या लवकर येऊन पडेल अशी त्यांपैकीं कोणाचीहि अपेक्षा नव्हती. व्यक्तिदृष्ट्या व संघदृष्ट्या त्या कार्यकर्त्यांच्या मनाची अशी तयारी झालेली नव्हती. आणि म्हणून संघदृष्ट्या देखील हें अद्वितीय कार्य आपण पुढें चालवूं शकूं अशी ईर्षा, धमक वा असा उत्साह सेवाग्राम–संमेलनांत दिसून आला नाहीं. ह्यांत कार्यकर्त्यांचा दोष आहे असें नाहीं. कारण गांधीजींचें कार्यच अत्यंत कठिण, जबाबदारीच्या दृष्टीनें छाती दडपून टाकणारें व जनतेचा नैतिक विश्वास संपादण्याची कसोटी लावून पाहतां अतिशय दुष्कर असें आहे.

आणि म्हणून सेवाग्रामला जमलेल्या निष्ठावान् कार्यकर्त्यांनीं जपून पावलें टाकलीं नसतीं तरच आश्चर्य झालें असतें. कार्यकर्त्यांनीं फार सावधगिरीनें विचार केलेला आहे असें त्यांच्या अडचणींचा सहानुभूतीनें विचार केल्यास म्हणतां येण्यासारखें आहे. आपलें हंसें होऊं नये येवढी तरी काळजी विचारी मनुष्यानें घेणें जरूरीचेंच असतें.

## सेनानीच्या पश्चात् सैनिक

गांधीजींचें कार्य हें सत्याग्रहाचें कार्य आहे. हें नुसतें सद्‌गुणसंवर्धक, परोपकाराचें व दयामय कार्य नाहीं. परोपकारी, सेवारत लोककार्यामध्यें जर सत्याग्रहाचा उत्साह व आचार यांचें मिश्रण नसेल तर तें गांधीजींचें कार्य होऊं शकत नाहीं. सत्याग्रहांत सविनय कायदेभंगाच्या युद्धाची सतत तयारी व समयज्ञतेनें उपयोगांत आणावयाचें उपवासाचें शस्त्र हीं अंतर्भूत आहेतच. आणि म्हणून सत्याग्रह हें असिधाराव्रत आहे. गांधीजी जिवंत असेपर्यंत ह्या असिधाराव्रताची जबाबदारी त्यांनींच सर्वशः पत्करल्यामुळें, त्यांच्या अनुयायांचा भार ह्या सत्याग्रहशस्त्राबाबत फारच कमी झालेला होता. कुटुंबांत असाधारण कर्तबगार पुरुष असल्यास कुटुंबांतील हरएक व्यक्तीस आपल्या जबाबदारीची तीव्रता फार कमी भासते. गांधीजींच्या हजारों निष्ठावान् कार्यकर्त्यांकडून गांधीजींनीं चालविलेल्या सत्याग्रही युद्धास सैनिकांच्या नात्यानें ही मदत पोंचविली गेली आहे. परंतु सेनानीच्या नात्यानें ही मदत पोंचविण्याचें शिक्षण त्यांना मिळालेलें नाहीं. सत्याग्रही सेनेचा सेनानी हा स्वयंभू पुरुष असावा लागतो. त्याच्या प्रबोधशक्तीनेंच तो इतर सत्याग्रही सैनिकांवर प्रभुत्व मिळवितो. सत्याग्रही सैनिक हिंदुस्थानांत पुष्कळ व पुरेसे आहेत; पण सत्याग्रही सैनिकांचे सेनानी होण्यास आपण पात्र आहों कीं काय हें अजमाविण्याची वेळ मात्र गांधीजींच्या प्रभावी अनुयायांस गांधीजी जिवंत असेपर्यंत आलेली नव्हती; आणि म्हणूनच सेवाग्रामच्या संमेलनांत असे सत्याग्रही सेनानी एकदम पुढें येऊं शकले नाहींत. असे सत्याग्रही सेनानी आपण आहों असें भासविण्यांत आत्मप्रत्ययापेक्षां अहंकारच अधिक प्रतीत झाला असता; अशीहि भीति प्रत्येक निष्ठावान् कार्यकर्त्यास वाटत असणें अस्वाभाविक नाहीं.

## गांधीजींनीं ठेविलेला वारसा

परंतु गांधीजींनीं जगाच्या राजकीय इतिहासाचा एक नवीन उज्ज्वल भाग लिहिलेला आहे, सांस्कृतिक दृष्ट्या हिंदुस्थानचें शिर जगांतील राष्ट्रांशीं तुलना करतां गांधीजींनीं अधिक उन्नत केलेलें आहे. हिंदुस्थानचा लौकिक, मान व त्याची इभ्रत गांधीजींनीं आपल्या सत्याग्रहाच्या शिकवणुकीनें पूर्वीच्या कोणत्याहि पुढाऱ्यांपेक्षां अनेकपटींनीं जागतिक राष्ट्रांच्या मालिकेमध्यें वाढविलेली आहे अशी श्रद्धा गांधीजींच्या ज्या अनुयायांच्या अंतःकरणांत तेवत आहे, त्यांना गांधीजींची परंपरा पुढें चालविणें जरूर आहे. ही परंपरा गांधीजींवर स्तुतिसुमनें उधळून किंवा

त्यांचे पुतळे बनवून चालवितां येणार नाहीं. गांधीजींच्या शिकवणुकीचा संबंध शब्दांशीं फारसा नाहीं, आचरणाशीं आहे. गांधीजींच्या सत्याग्रही आचरणाची तीव्रता अनुयायांनीं स्वतःमध्यें उत्पन्न करण्यानेंच गांधीजींची परंपरा टिकूं शकेल व जागतिक राजकीय इतिहासांत हिंदुस्थानच्या सत्याग्रहाचा संदेश पसरवितां येईल.

दोन हजार वर्षांपूर्वी बुद्धाचा अवतार हिंदुस्थानांत झाला. ब्राह्मण–धर्मानें गौतम बुद्धाचा धर्म हिंदुस्थानांत टिकूं दिला नाहीं. गौतम बुद्धाचा धर्म हिंदुस्थानाबाहेरच सांप्रत अधिक विस्तारानें दिसून येतो. महात्मा गांधींच्या सत्याग्रही धर्माच्या शिकवणुकीची गरज जशी हिंदुस्थानास आहे, त्याचप्रमाणें ती अखिल जगासहि आहे. गांधीजींची सत्याग्रही शिकवणूक गांधीजींच्या मृत्यूनंतर हिंदुस्थान जर आत्मसात् करूं शकला नाहीं आणि गांधीजींच्या शिकवणुकींत जर प्रस्तुत हिंसात्मक राजकारणास कलाटणी देणारें शाश्वत तत्त्व अंतर्भूत झालेलें असेल तर जगांतहि तें कोठें तरी आज ना उद्यां 'कालोह्ययं निरवधिर्विपुला च पृथ्वी' या न्यायानें स्वीकृत झाल्याशिवाय राहणार नाहीं. तथापि गांधीजी ज्याअर्थी हिंदुस्थानास ही सत्याग्रहाची देणगी देऊन निर्वाणास गेले आहेत, त्याअर्थी हिंदुस्थानच्या भूमींतच ह्या सत्याग्रही शिकवणुकीच्या बीजाचा वृक्ष होऊन त्याची सावली जगास मिळण्यांत हिंदुस्थानाचा थोरपणा दिसून येण्यासारखा आहे. आणि गांधीजींच्या हिंदुस्थानांतील अनुयायांचा गांधीजींच्या मृत्यूनंतर हा वारसाहि आहे.

रचनात्मक कार्य करणारे सेवक हेच गांधीजींच्या सत्याग्रही शिकवणुकीचे खरे वाररसदार आहेत. रचनात्मक कार्य हीच गांधीजींच्या सत्याग्रहाची पूर्वतयारी आहे. सेवकांच्या नैतिक उन्नतीचें तें साधन आहे. रचनात्मक कार्य हा अहिंसक समाजरचनेचें ध्येय पुढें ठेवून तें ध्येय साध्य करण्यासाठीं करावयाचा जरूरीचा उद्योग आहे. गांधीजींनीं आंखून दिलेलें रचनात्मक कार्य हे नुसते कष्ट नाहींत. केवळ परिश्रम नाहींत किंवा ती केवळ परोपकारी सेवाहि नाहीं. Labour is toil with no end in view, work is activity with a plan and service is working for others or love. रचनात्मक कार्य हें ह्या तिन्ही प्रकारच्या हालचालींपेक्षांहि विशेष असें कार्य आहे. अहिंसक समाजरचनेचा तो पाया आहे व सत्याग्रहाचें तें शरीर आहे. अशा प्रकारच्या रचनात्मक कार्याच्या शिकवणुकीमध्यें गांधीजींचें सर्व आयुष्य व्यतीत झालेलें आहे.

## महाराष्ट्रीय कार्यकर्त्यांचें पुढील पाऊल

गांधीजींच्या मृत्यूनंतर रचनात्मक कार्यकर्ते हताश न होतां एकत्र येऊन संघटितपणानें व जबाबदारीनें विचार करूं लागले आहेत, ह्यांतच हिंदुस्थानची पुढील आशा सांठविलेली आहे. ते कार्यकर्ते सांप्रदायिकपणा बाजूस सारून धिम्मेपणानें आपआपली शक्ति ओळखून, जागरूकतेनें संघटन करण्याचा प्रयत्न करीत आहेत, हेंहि सुचिन्ह आहे. अशा दृष्टीनें रचनात्मक कार्यकर्त्यांच्या हालचालींचें सहानभूतिपूर्वक निरीक्षण केल्यास सेवाग्रामच्या संमेलनानंतर महाराष्ट्रीय रचनात्मककार्यकर्त्यांनीं तावडतोब अंबरनाथ येथें नुकतेंच जें संमेलन भरविलें तो उपक्रमहि अभिनंदनीय आहे असें म्हणावें लागतें. सुमारें पांचशें कार्यकर्ते अंबरनाथ येथें एकत्रित झाले होते. राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष बाबू राजेंद्र प्रसाद ह्यांनीं रचनात्मक कार्याचें तत्त्वज्ञान ह्या प्रसंगीं थोडक्यांत परंतु समर्पक रीतीनें समजावून दिलें. यंत्राचा गुलाम होण्याकडे व खर्चिक राहणीचें दास बनण्याकडे पाश्चात्य संस्कृतीची निश्चित गति दिसून येत आहे; गांधीजींचें जीवनरहस्य यंत्रास मनुष्याचे स्वामी न होऊं देण्यांत व खर्चिक राहणी म्हणजेच मानवी संस्कृति ही व्याख्या खोटी ठरविण्यांत सांठविलेली आहे हें बाबू राजेंद्र प्रसाद यांनीं कार्यकर्त्यांस पटवून देण्याचा प्रयत्न केला.

महाराष्ट्रीय कार्यकर्त्यांनीं जे ठराव मान्य केले आहेत, त्यांकडे लक्ष दिल्यास असें दिसून येईल








कीं, त्यांत सेवाग्रामच्या संमेलनापुढें एक पाऊल टाकलेलें आहे. कार्यकर्त्यांपुढें राजकीय मनोवृत्तीच्या आहारीं न जातां राजकीय पक्षांच्या बाहेर राहून सामाजिक सेवा करण्याचा आदर्श ह्या ठरावाअन्वयें उभा करण्यांत आला आहे. नैतिक प्रकर्षामुळेंच राजकीय कार्य उन्नत होऊं शकतें आणि म्हणून कार्यकर्त्यांनीं जनसेवारत व अपरिग्रही राहून राज्ययंत्र व पक्षविशिष्ट राजकारण ह्यांच्या बाहेर आपली वृत्ति व कार्य ठेवून त्यांचें निरहंकारी आचरणानें शुद्धीकरण करण्याचा सतत प्रयत्न करीत राहण्यानेंच समाज उन्नत होऊं शकतो हें सनातन तत्त्व कार्यकर्त्यांच्या ह्या संमेलनांत सुस्पष्ट रीतीनें व योग्य शब्दांत मांडलेलें आहे.

देशव्यापी काँग्रेस–पक्ष व त्या पक्षाच्या पाठिंब्यावर उभी असलेली राज्यसंस्था, ह्या दोन्ही प्रभावी संघटना देशांत व प्रांतांत आहेत. त्यांच्याशीं सद्यःस्थितींत अविरोधी राहून त्या दोन्ही संस्थांमध्यें नैतिक उन्नति स्वतःच्या आचरणानें व सत्याग्रही साधनेनें कशी घडवून आणतां येईल हीच खटपट रचनात्मक कार्यकर्त्यांस कसोशीनें करावयाची आहे. रचनात्मक कार्यकर्त्यांस शिस्तीचा असा एक आपला संघ बनवून हें कार्य करणें जरूर आहे. हा संघ देशकार्यदृष्ट्या प्रभावी बनला पाहिजे, तरच राज्यसंस्था, काँग्रेसपक्ष व नवीन उदयास येणारे इतर राजकीय पक्ष ह्यांच्यावर तो नैतिक परिणाम घडवून आणूं शकेल.

## रचनात्मक कार्यकर्ते आणि इतर संस्था

काँग्रेसच्या बाहेर राहूनच आपल्या असाधारण प्रभावी व्यक्तिमत्त्वामुळें काँग्रेसला गांधीजी उपकारक बनले. गांधीजी काँग्रेसचे नव्हते; काँग्रेस गांधीजींची संस्था होती. आपलें सत्याग्रहाचें जगदुपकारक शास्त्र व शस्त्र अधिकाधिक कार्यक्षम व प्रभावी बनविण्यासाठीं गांधीजींनीं काँग्रेसला आपलें साधन बनविलें. हें सत्याग्रहशास्त्र ज्यांस अल्पांशानें पेलतां येईल अशा सैनिकांचें सैन्य जमविणें गांधीजींस जरूर होतें. सत्याग्रहाचें तत्त्वज्ञान कमीअधिक प्रमाणांत आचरणांत उतरविणारी संस्था किंवा सेना म्हणजे काँग्रेस असा गांधीजींचा काँग्रेसकडे पाहण्याचा दृष्टिकोण होता. हे सत्याग्रही सैनिक जेव्हां 'mark time' करीत, त्या वेळीं कौन्सिलांचें किंवा पार्लमेंटरी कार्य हे सत्याग्रही सैनिकच करीत आहेत असें दृश्य दिसून येई. काँग्रेससारख्या देशव्यापी संस्थेच्या पाठिंब्याशिवाय पार्लमेंटरी किंवा कौन्सिलांच्या राजकारणास मुळींच जोर येऊं शकत नाहीं. रचनात्मक कार्य करणाऱ्या संस्था, काँग्रेस व कौन्सिलें ह्या तिन्ही प्रकारच्या राजकारणी संघटना गांधीजींच्या सत्याग्रही राजकारणास उपयोगी असल्या, तरी गांधीजींचे संबंध ह्या सर्व संघटनांबाबत कमीअधिक प्रमाणांत जवळचे किंवा दूरचे होते. रचनात्मक कार्यकर्त्यांशीं गांधीजींचे संबंध स्वतःच्या कुटुंबासारखे होते; कारण, रचनात्मक कार्य हें सत्याग्रहाचा गाभा आहे अशी गांधीजींची धारणा होती. रचनात्मक कार्यकर्त्यांस जर गांधीजींचें कुटुंबीय मानलें तर काँग्रेस–कार्यकर्त्यांस गांधीजींचे इष्टमित्र समजतां येईल व कौन्सिलांचे कार्यकर्ते हे ह्या इष्टमित्रांच्या पलीकडचे संबंधी मानतां येतील. हेंच नातें विधायककार्यकर्त्यांच्या संघानें निर्माण केल्यास हा संघ काँग्रेसचा किंवा कोणत्याहि राजकीय पक्षाचा नसूनहि त्या सर्व पक्षांस नैतिक दृष्ट्या उपकारक होऊं शकेल.

गांधीजींचें कार्य प्रांतानिहाय करणारा व त्यांची जागा अंशतः भरून काढणारा असा संघ बनविल्याशिवाय गांधीजींची परंपरा देशांत अव्याहतपणानें चालू ठेवणें कठिण आहे, हें महाराष्ट्रीय कार्यकर्त्यांनीं ओळखलें आहे असें त्यांनीं जे ठराव मंजूर केले आहेत, त्यांवरून म्हणतां येण्यासारखें आहे. प्रांताच्या किंवा देशाच्या नैतिक उन्नतीची ज्यांना चिंता वाटते अशा सर्व सत्प्रवृत्त लोकांनीं हा विधायककार्यकर्त्यांचा संघ बलिष्ठ, कार्यक्षम व सत्याग्रही कसा बनवितां येईल ह्याचें चिंतन केलें पाहिजे व असा संघ बनविण्यास साहाय्य केलें पाहिजे.

---








स्फुट लेख

# वैवाहिक दुर्वर्तन

श्री. द. ग. येरवडेकर

सन १९२८ सालीं हिंदुस्थान सरकारनें सर मोरोपंत जोशी यांच्या अध्यक्षतेखालीं संमतिवय कमिटी नेमली होती व तिचा अहवाल १९२९ सालीं प्रसिद्धहि झाला होता. त्या अहवालांत विवाहाचें व संमतीचें वय वाढवून हिंदी स्त्रियांचा शारीरिक ऱ्हास थांबवावा या हेतूनें जे अनेक उपाय सुचविण्यांत आले होते त्यांपैकीं बालविवाहप्रतिबंध या एकाच उपायाला कायद्याचें स्वरूप देऊन सरकार गप्प बसलें. बालविवाह प्रतिबंधक कायद्यानें मुली व मुलगे यांच्या विवाहाचें किमान कायदेशीर वय ठरवून देण्यांत आलें असलें तरी विवाहबाह्य संमतिवय १४ वरून १८ वर न्यावें व वैवाहिक संमतिवय १२ वरून १५ पर्यंत न्यावें व विवाहबाह्य जबरी संभोग व विवाहांतर्गत जबरी संभोग हे वेगवेगळे गुन्हे ठरवून त्यांना वेगवेगळ्या शिक्षा ठरवून द्याव्यात इत्यादि जे महत्त्वाचे उपाय वरील जोशी-कमिटीनें सुचविले होते त्याबद्दल आजपर्यंतच्या २० वर्षांत सरकारनें कोणतीच गोष्ट आपण होऊन केलेली नाहीं.

म्हणून १९२८ च्या सर मोरोपंत जोशी यांच्या अध्यक्षतेखालच्या संमतिवय कमिटीचे एक सभासद श्री. ठाकूरदास भार्गव यांनीं हिंदी कायदेमंडळांत पीनल कोड व क्रिमिनल प्रोसीजर कोड यांच्यांत दुरुस्त्या सुचविणारें एक नवीन बिल आणलें आहे. कायदेमंडळानें तें दाखल करून घेतलें असून लोकमत अजमावण्यासाठीं तें सरकारी गॅझेटांत प्रसिद्ध करण्यांत आलें आहे. लोकांनीं त्यावरील आपल्या सूचना व मतें आपआपल्या प्रांतिक सरकारांमार्फत जून १९४८ च्या अखेरीपर्यंत कळविलीं पाहिजेत.

श्री. ठाकूरदास भार्गव यांच्या या नव्या बिलाचीं नऊ कलमें आहेत. पहिलें कलम प्रास्तविक असून दुसऱ्या कलमानें इंडियन पीनल कोडाच्या कलम ३६१ मधील अज्ञान मुलीच्या वयाची मर्यादा १६ वरून १८ पर्यंत वाढविण्यात आली आहे. पीनल कोडांतील या कलमानें कायदेशीर पालकापासून त्याच्या ताब्यांतील अज्ञान व्यक्ती अगर वेडी व्यक्ती पालकाच्या संमतीशिवाय फूस लावून अगर पळवून नेणें हा गुन्हा ठरविण्यांत आला आहे. आजपर्यंत या कलमांतील अज्ञान मुलीचें कमाल वय १६ होतें तें १८ करण्यांत यावें असा श्री. ठाकूरदास भार्गव यांच्या नव्या दुरुस्तीचा हेतु आहे व धामधुमच्या काळांत स्त्रियांना पळविण्याचे प्रकार फार मोठ्या प्रमाणावर होतात हा सर्वांचा ताजा अनुभव असल्यामुळें ही दुरुस्ती योग्य अशीच आहे.

श्री. भार्गव यांच्या बिलांतील तिसऱ्या कलमानें पीनल कोडांतील ३७५ व्या म्हणजे 'जबरीसंभोगाच्या' कलमांत अशा दुरुस्त्या सुचविण्यांत आल्या आहेत कीं, ज्यामुळें तें कलम यापुढें फक्त विवाहबाह्य 'जबरीसंभोगालाच' लागूं पडेल व त्यांतील गुन्ह्याला बळी पडणाऱ्या स्त्रीची किमान संमतिवयाची मर्यादा १४ वरून १८ पर्यंत वाढविली जाईल. वर सूचित केल्याप्रमाणें 'जबरीसंभोग' हा जसा विवाहबाह्य असूं शकतो तसाच तो १३ वर्षांहून कमी वयाच्या पत्नीच्या बाबतींत तिच्या खुद्द पतीकडूनहि होऊं शकत असे व हे दोनहि गुन्ह्यांचे प्रकार आजपर्यंत एकाच म्हणजे ३७५व्या कलमांत एकत्र कोंबण्यांत आलेले होते. पण संमतिवय कमिटीनें हे दोन गुन्हे वेगवेगळे करण्यांत येऊन








त्यांना वेगवेगळ्या शिक्षा ठरवून देणें जरूर आहे असें प्रतिपादन केलें होतें. त्याप्रमाणें श्री. भार्गव यांच्या बिलांतील तिसऱ्या कलमानें पीनल कोडांतील ३७५ वें कलम सर्वस्वी विवाहबाह्य जबरीसंभोगापुरतेंच मर्यादित राहील अशी दुरुस्ती सुचविली आहे व ती योग्य आहे.

पण विवाहबाह्य जबरीसंभोगाच्या बाबतींत संमतिवय एकदां १८ पर्यंत वाढविलें म्हणजे त्यापुढें जाऊन अशा जबरीसंभोगाचे सोळा वर्षांखालच्या परस्त्रीशीं जबरीसंभोग व १६ ते १८ दरम्यानच्या परस्त्रीशीं तिच्या संमतीनें केलेला जबरीसंभोग असे दोन प्रकार करून दुसऱ्या प्रकाराला कमी शिक्षा देण्याचा उपक्रम श्री. भार्गव यांनीं आपल्या बिलाच्या चौथ्या कलमांत सुचविला आहे तो चुकीचा व अयोग्य आहे असें म्हणावें लागतें. १६ वर्षे वयाखालच्या परस्त्रीशीं, तिची संमति असो किंवा नसो, जबरीसंभोग करणाऱ्या गुन्हेगाराला जन्मठेप किंवा दहा वर्षेपर्यंतची तुरुंगवासाची कमाल शिक्षा व १६ ते १८ च्या दरम्यानच्या परस्त्रीशीं तिच्या संमतीनें जबरी संभोग करणाऱ्या गुन्हेगाराला मात्र २ वर्षे तुरुंगवासाची कमाल शिक्षा असा जो तरतमभाव श्री. भार्गव यांनीं सुचविला आहे तो निषेधार्ह आहे. सामाजिक स्थैर्य व नीतिमत्ता यांचें रक्षण व वर्धन व्हावयाचें असेल तर सर्व प्रकारच्या विवाहबाह्य संभोगांचा कडकडीत निषेध व प्रतिबंध कायद्यानें होणें अवश्य आहे. म्हणून हें बिल ज्यावेळीं कायदे मंडळापुढें चर्चेसाठीं व मंजुरीसाठीं येईल त्यावेळीं ही दुरुस्ती होणार नाहीं अशी खबरदारी घेण्यांत आली पाहिजे.

आपल्या बिलाच्या पांचव्या कलमांत श्री. ठाकूरदास भार्गव यांनीं 'वैवाहिक दुर्वर्तन' हा नवा गुन्हा व त्याबद्दलची शिक्षा यांची तरतूद करणारीं ३७६ अ व ३७६ ब अशीं दोन नवीं कलमें पीनल कोडांत घालण्याची दुरुस्ती सुचविली आहे. 'जबरी संभोगा'चा एकच गुन्ह्याचा प्रकार ठरवून त्यांतच परपुरुषानें परस्त्रीशीं केलेला जबरीसंभोग व पतीनें अल्पवयी पत्नीशीं केलेला तांत्रिक जबरीसंभोग या दोहोंची इतके दिवस गल्लत करण्यांत आलेली होती. धर्मकल्पना व नीतिकल्पना विवाहांतर्गत संभोगाला विरोधी नसल्यामुळें अशा संभोगामुळें अल्पवयी पत्नीला व भावी प्रजेला शारीरिक इजा पोंचूं नये म्हणून कायद्यानें असल्या प्रकारांना गुन्ह्याचें स्वरूप दिलें व म्हणून वर त्याला 'तांत्रिक' असें उल्लेखिण्यांत आलें आहे. विवाहबाह्य जबरीसंभोग व विवाहांतर्गत जबरीसंभोग यांच्यामधील हा भेद इतक्या मौलिक महत्त्वाचा आहे कीं संमतिवय कमिटीनें हे गुन्हे अलग करण्याची २० वर्षांपूर्वी केलेली सूचना सरकारनें त्याचवेळीं स्वीकारावयास हवी होती. पण, कारण कोणतेंहि असो, ही गोष्ट आजपर्यंत झाली नाहीं खरी. ती घडवून आणण्याचें श्रेय श्री. भार्गव हे घेत आहेत ही फार चांगली गोष्ट आहे.

संमतिवय कमिटीनें सुचविलेलें व श्री. भार्गव यांनींहि स्वीकारलेलें या नव्या गुन्ह्याचें नांव इंग्रजी भाषेत 'मॅरिटल मिस्बिहेव्हियर' असें आहे. नव्या ३७६ अ या कलमांत या गुन्ह्याची व्याख्या पुढीलप्रमाणें करण्यांत आली आहे— "पंधरा वर्षे वयाखालच्या पत्नीशीं तिच्या संमतीनें अगर शिवाय संभोग करणें म्हणजे वैवाहिक दुर्वर्तन करणें होय." यानंतरच्या ३७६ ब या कलमांत या नव्या गुन्ह्याला शिक्षा ठरवून देतांना केलेली तरतूद पाहिली म्हणजे विवाहबाह्य जबरी संभोग व वैवाहिक दुर्वर्तन या दोन गुन्ह्यांत करण्यांत आलेला फरक दिसून येतो. पाहिल्या गुन्ह्याला वेळप्रसंगीं जन्मठेपेची शिक्षा देण्याचा अधिकारहि कोर्टाला ठेवण्यांत आलेला आहे. वैवाहिक दुर्वर्तनाला जास्तींत जास्त शिक्षा म्हणजे १० वर्षे तुरुंगवास होय. जन्मठेप नाहीं हाच तो फरक होय. ही कमाल शिक्षा पत्नीचें वय १२ हून कमी असेल तर देण्यांत यावयाची आहे. पत्नीचें वय १२ ते १५ च्या दरम्यान असेल तर वैवाहिक दुर्वर्तनाला जास्तींत जास्त शिक्षा २ वर्षांचा तुरुंगवास अशी सुचविण्यांत आली आहे. ही सवलत या गुन्ह्याचें तांत्रिक स्वरूप लक्षांत घेतां व तें १२ हून पत्नीचें वय जितकें १५ कडे अधिक झुकतें असेल त्यामानानें तिला शारीरिक इजा होण्याचा संभव तितका कमी होत जाणार असल्यामुळें योग्य अशीच आहे.








# वैवाहिक दुर्वर्तन

वैवाहिक दुर्वर्तनाच्या या नव्या गुन्ह्याला आणखीहि अपवाद निर्माण करून श्री. भार्गव यांनी मुरड घालण्याचा प्रयत्न आपल्या बिलाच्या सहाव्या कलमांत केला आहे. मात्र हे अपवाद पीनल कोडांत नमूद न करतां क्रिमिनल प्रोसिजर कोडांत समाविष्ट करण्याचा त्यांचा हेतु दिसतो. पीनल कोडांत निरनिराळ्या गुन्ह्यांचीं मूलतत्त्वें व शिक्षा सांगितल्या असून त्या गुन्ह्यांची चौकशी कशी करावयाची हें क्रिमिनल प्रोसिजर कोडांत सांगितलें आहे. सबब हे अपवाद क्रिमिनल प्रोसीजर कोडांत समाविष्ट करण्याऐवजीं पनिल कोडांतच करणें अधिक सयुक्तिक झालें असतें असा कित्येकांचा अभिप्राय असण्याचा संभव आहे. पण या मतभेदाला फारसें महत्त्व देण्याचें मुळींच कारण नाहीं. जे अपवाद सांगितले आहेत ते समाजाला हितावह असले म्हणजे झाले. मग ते कोणत्याहि कायद्याच्या पुस्तकांत नमूद केलेले असले तरी चालतील.

आपल्या बिलाच्या सहाव्या कलमांत श्री. भार्गव यांनीं हे अपवाद पुढें दिल्याप्रमाणें सांगितले आहेत. वैवाहिक दुर्वर्तनाच्या गुन्ह्याची दखल गुन्हा घडल्या दिवसापासून एक वर्षाच्या आंत फौजदारी काम सुरूं करण्यांत आलें नसेल तर कोणतेंहि कोर्ट घेणार नाहीं; त्याचप्रमाणें लग्नाच्या दिवशीं पत्नी जर १३ वर्षांहून कमी वयाची नसेल व तें लग्न हा दुरुस्तीचा कायदा अंमलांत येण्यापूर्वी झालेलें असेल तर वैवाहिक दुर्वर्तनाच्या गुन्ह्याची दखल कोणतेंहि कोर्ट घेणार नाहीं. हीं मुदतीचीं बंधनें घालून या नव्या गुन्ह्याचें शस्त्र त्या त्या मुदतीनंतर आपोआप बोथट व निरुपद्रवी होईल अशी व्यवस्था करण्यांत श्री. भार्गव यांनीं समाजहिताविषयीं योग्य ती आस्था व कळकळ व्यक्त केली आहे.

यापुढील ७, ८, ९, हीं शेवटचीं तीन कलमें पीनल कोडांत सुचविलेल्या वरील मुख्य दुरुस्त्यांच्या अनुरोधानें क्रिमिनल प्रोसिजर कोडांत अनुषंगिक दुरुस्त्या सुचविणारी असल्यामुळें मामुली स्वरूपाचीं आहेत. सबब त्यांचा वेगळा परामर्श घेण्याची जरूरी नाहीं.

संमतिवय कमिटीनें सुचविलेल्या दुरुस्त्या आज २० वर्षांनीं कायद्यांत समाविष्ट करण्यांत येत आहेत. त्यामुळें या २० वर्षांच्या काळांत समाजाच्या आचारविचारांत व लोकमतांत जीं स्थित्यंतरें झालीं आहेत व होत आहेत त्यांचा कानोसा घेतां या दुरुस्त्यांविरुद्ध ओरड होण्याचें कारण दिसत नाहीं.

———

आपल्या तरुणांनीं, तेजस्वी युवकांनीं हिंदी आरमारांत दाखल व्हावयास पाहिजे. मी जर आज तरुण असतों तर मला आरमारांत दाखल होणें मनापासून आवडलें असतें. अर्थात् आरमारापेक्षां एक गोष्ट मला अधिक आकर्षक वाटते. ती म्हणजे आकाशयान किंवा वैमानिकदल. पण दुर्दैव असें कीं प्रत्यक्ष जीवनांत मला उलटाच अनुभव आला आहे. ज्याची मला मनापासून चीड आहे, तें कचेरींमधील बैठें काम माझ्या नशिबीं आलें आहे !

—पं. जवाहरलाल नेहरू

१४-३-४८








# सार-संकलन

## १ महात्मा गांधी व समाजवाद

" महात्माजींना असीम श्रद्धेनें संत, द्रष्टा व राजकारणपटु मानलें गेलें. पण गांधीजी निव्वळ संत नव्हते. ते जर केवळ संत असते तर भारतानें व अखिल विश्वानें त्यांची पूजा केली असती खास, पण सर्वश्रेष्ठ मानून नव्हे !

गांधीजी द्रष्टे होते. मनुष्यजातीमध्यें असे अनेक द्रष्टे होऊन गेले आहेत. पण महात्माजी सामान्य मनुष्यापेक्षां फारच उच्च पातळीवर होते. त्यांनी आपल्या तत्वासाठीं अनंत यातना सोसल्या. मानव्याचा प्रकाश, आपली जीवनज्योत पाजळून दाखविला. गांधीजी असे एक अनुपमेय द्रष्टे होते. पण केवळ द्रष्टे होते म्हणून कांहीं ते सर्वश्रेष्ठ मानले गेले नव्हते. जगांतील इतर सर्व महापुरुषांहून जें विशेष थोरपण महात्माजींना लाभलें तें, संत व द्रष्टे असूनहि त्यांनीं आपल्या पिढींतील राजकीय लढ्यांत प्रत्यक्ष भाग घेतला, त्यामुळेंच होय. सामान्यतः संत स्वतःचें व दुसऱ्यांचें पारमार्थिक कल्याण करण्यांतच संतोष मानतात. त्याचप्रमाणें द्रष्टे पुरुष प्रचलित प्रश्न व रीति-रिवाज यांच्याकडे दुर्लक्ष करून चिरंतन सत्याच्या शोधांत, काल्पनिक जगांत वावरत असतात. ते म्हणतात, आपलें जग या जगाच्या पलीकडे आहे.

जगांत पहिल्यानें महात्माजींनीं साधुसंतांची वरलि प्रकारची जीवनाची रीत बदलली. साधुसंतांचें जीवन जगतां जगतां, केवळ शाश्वत सत्याचा प्रचार करून ते थांबले नाहींत, तर आपली थोरवी व सत्य यांचा जनतेनें प्रचालित प्रश्न सोडविण्यासाठीं त्यांनीं उपयोग केला. आणि त्यांत ते यशस्वी झाले. गेल्यां वर्षींच भारतांतील सर्वांत गुंतागुंतीचा जाति-वैमनस्याचा प्रश्न घ्या. महात्माजींनीं उपोषण केलें. कदाचित् याला कांहीं लोक राजकारण म्हणणार नाहींत पण **'राजकारणाचा उद्देश जर माणुस-कीस लागलेली कीड' नाहींशी करणें हाच असेल तर त्यासाठीं याहून अधिक प्रभावी उपाय दुसरा सांपडूच शकला नसता.** मुरामारी व जाळपोळ यांनीं कलकत्त्याला घोर नरकाचें रूप आणलें होतें. गांधीजींनीं तीनच दिवसांच्या उपवासानें त्या अघोरी अत्याचारांना इतका आळा घातला कीं त्यांची पुनरावृत्ति आजवर झाली नाहीं. दिल्लीमध्यें गांधीजींच्या उपवासानें हिंदुस्थान सरकारवर असा प्रभाव पडला कीं त्यांनीं मुसलमानांच्या बाबत अधिक उदारतेचें धोरण व्यक्त केलें. परिणामीं दोन्ही जमातींत शांतता नांदून अंतःकरणाचा पालट झाला. बहुधा काश्मीरचा दुःखद प्रश्नही त्यामुळेंच योग्य रीतीनें मिटेल.

भौतिक तत्त्वज्ञानावर विश्वास ठेवणारे युरोपियन समाजवादी गांधीजींच्या अध्यात्मवादी पध्दतीला कदाचित् विक्षिप्त मानीत असतील पण फल-निष्पत्तीच्या दृष्टीनें पाहिलें तर आपल्यास कबूलच करावें लागेल कीं गांधीजींनीं हिंदुस्थानांतील राजकीय वातावरणांत असा एक बदल घडवून आणला आहे कीं ज्यामुळें समाजवादी विचारसरणी रुजण्यास अनुकूल वातावरण आतां निर्माण झालें आहे. गांधीजींच्या मृत्यूपूर्वी सुमारें एक महिना अँट्वर्प येथील आंतरराष्ट्रीय समाजवादी परिषदेस












आलेल्या भारतीय प्रतिनिधींस मी भेटलों होतों. भारतांतील समाजवादाच्या प्रचारासंबंधीं ते बरेच निराश दिसले. त्यांनीं सांगितलें कीं, जातीय वैमनस्यानें भारतीय जनतेचीं मनें इतकीं गढूळ झालीं आहेत कीं हिंदु–मुस्लिम–शीख शेतकरी–कामकऱ्यांची एकजूट करण्याच्या समाजवाद्यांच्या प्रयत्नास जनतेचा भरपूर पाठिंबा मिळेनासा झाला आहे. तथापि महात्माजींनीं दिल्लींत तीन दिवसांचें उपोषण केलें आणि वातावरणांत असा विलक्षण बदल घडवून आणला कीं समाजवादी पक्षाला मुंबईंत ३० हजार हिंदु–मुस्लिम मजूरांचा मेळावा घडवून आणतां आला. आणि त्यामध्यें जातीयवाद पुरा गाडून टाकून एकीनें कार्य करण्याचा निश्चय करता आला.

गांधीजी स्वतःस समाजवादी म्हणवीत. पण शास्त्रीयदृष्ट्या ते समाजवादी नव्हते. आपल्या दीर्घकाळच्या बंदिवासांत एकदां त्यांनीं मार्क्सचा 'कॅपिटल' हा ग्रंथ वाचला होता. आणि शेवटीं म्हणाले होते, 'मला यांच्या इतकी वाचनाला फुरसत मिलाली असती तर मला वाटतें मी यांच्यापेक्षां फार चांगला ग्रंथ लिहिला असता'. वस्तुतः **गांधीजींची समाजव्यवस्था समाजवादापेक्षां 'राज्याच्या अभावाकडेच' आधिक झुकत असे.** प्रत्येक खेडें हें त्यांच्या समाजव्यवस्थेचें घटक ( Unit ) होतें. राष्ट्रीय संपत्ति शहरांत केंद्रित करण्यापेक्षां विकेंद्रित करून खेड्याखेड्यांतून विभागून दिली जावी असें त्यांचें मत होतें. सारी जमीन समाजाची असावी; व उद्योगधंद्यांचें राष्ट्रीयकिरण व्हावें असें त्यांचें ठाम मत होतें. शासनशक्तीच्या केंन्द्रीकरणाच्या मुध्दां ते विरुध्द होते. " प्रांतिक कारभारांत ग्रामपंचायतींच्या प्रतिनिधींना योग्य स्थान आणि त्या द्वारें राष्ट्राच्या मध्यवर्ति कारभारमंडळाची निवड " या तत्त्वाच्या पायावर त्यांच्या राज्ययंत्राची उभारणी व्हावी असें त्यांना वाटत होतें.

गांधीजी अहिंसेचे अविचल भक्त होते. त्यांचा अहिंसेवर दृढ विश्वास होता. नव्या समाजव्यवस्थेवर त्यांच्या या भक्तीचा फार मोठा प्रभाव पडला होता. साम्राज्यशाहीविरुध्द लढण्यासाठीं ज्या साधनांचा उपयोग त्यांनीं केला होता तीं साधनें याही बाबतींत लागू होतीं. गांधीजींचा हा प्रयत्न होता. सर्व जमीनदार व भांडवलदार यांनीं आपले अधिकार आपण होऊन जनतेच्या स्वाधीन करावे. जर त्यांना हीं तत्त्वें व्यवहारांत उतरवितां आलीं नसतीं तर त्यांनीं त्यासाठीं आपलें असहकाराचें शस्त्र खास वापरलें असतें. जनमताला धाब्यावर बसविणाऱ्या जमीनदारांच्या व भांडवलदारांच्याच विरुद्ध करबंदी व बहिष्कार यांचा प्रयोग त्यांनीं खासच केला असता. गांधीजींचीं सर्वच तत्त्वें समाजवाद्यांना मान्य होण्यासारखीं नसलीं तरी एक गोष्ट त्यांना कबूल केलीच पाहिजे कीं हिंदुस्थान समाजवादाकडे जास्तींत जास्त झुकेल असें वातावरण गांधीजींनीं निर्माण केलें.

ब्रिटिश साम्राज्यशाहीचा अंत तेच करूं शकले. मला वाटतें, अजूनही आपल्याला त्यांच्या थोर प्रभावाची खरी जाणीव होऊं शकलेली नाहीं. कॉंग्रेसचा जन्म इंग्रजांची याचना करण्याच्या स्वरूपांत झाला. भारतीय जनता गुडघे टेकून सुधारणांच्या थोड्याशा अधिक तुकड्यासाठीं लाचार झालेली दिसत होती. गांधीजींनीं तिला नीट उभे राहायला शिकविलें. त्यांनीं तिला स्वाभिमानाचे धडे दिले. त्यांनी समाजांत एक सांस्कृतिक क्रांति घडवून आणली व जनतेला समाजवादाच्या तत्त्वापर्यंत आणून सोडलें.

स्वातंत्र्याच्या आकांक्षेला एका पिढींत मूर्त स्वरूप आणून त्यांनीं एक महान् चमत्कार करून दाखविला. केर हार्डीनें समाजवादाच्या दृष्टीनें जें ब्रिटनमध्यें मजूरांसाठीं करून दाखविलें तेंच गांधीजींनीं भारतीय जनतेसाठीं राष्ट्रीय दृष्ट्या करून दाखविलें. त्यांनीं जनतेमध्यें आत्मविश्वास निर्माण करून गुलामी मनोवृत्ति टाकून देण्यास तिला उद्युक्त केलें.

आपल्या आयुष्याच्या उत्तरार्धांत ते डाव्या गटाकडे झुकूं लागले, ही गोष्ट महात्माजींच्या अनेक आश्चर्यांपैकींच– वैशिष्ट्यापैकींच एक होय. वाढत्या वयाबरोबर मनुष्य म्हातारा होत जातो हें सर्वसामान्य सत्य आहे. पण गांधीजींची गोष्ट याच्या अगदीं उलट होती. दहा वर्षांपूर्वी भारतीय समाजवादी त्यांना कॉंग्रेसच्या उजव्या गटापैकीं मानत होते. आपल्या उत्तरवयांत ते भारतीय समाजवादी पक्षाचे







मित्र व संबंधी बनले होते. १९४० च्या कॉंग्रेस अधिवेशनांत मांडण्यासाठीं श्री. जयप्रकाश नारायण यांनीं भारतीय समाजवादी राज्यघटनेची रूपरेखा सांगणारा ठराव तयार केला होता. गांधीजींनीं या सर्वच ठरावाचें समर्थन त्यावेळीं केलें होतें. गेल्या दोन वर्षांपासून समाजवादी पक्षाकडून हिंदुस्थान-संबंधीं बऱ्याच अपेक्षा व आशा त्यांनीं मनांत बाळगल्या होत्या. त्यांनीं या पक्षानें कॉंग्रेसमधून फुटून जाऊं नये म्हणून त्यांचेवर बरेंच दडपण घातलें होतें. कारण त्यामुळेंच त्या पक्षाचा जातीयतेविरुद्ध प्रभाव राहूं शकेल व समाजवादाची प्रगति होईल असें त्यांना वाटत होतें. त्यांच्या अपेक्षेप्रमाणें गांधीजी जर १२५ वर्षें जगते तर राष्ट्रीय चळवळीकरितां आजवर त्यांनीं जें केलें तेंच भारतीय समाजवादाच्या चळवळीसाठींही त्यांनीं केलें असतें असा संभव होता.

हिंदुस्थानचीच नव्हे तर जगाची सर्वश्रेष्ठ विभूति नाहींशी झाली. स्वातंत्र्य, समानता व बंधुभाव वगैरे बाबतींत महात्माजींनीं घालून दिलेल्या आदर्शांपर्यंत पोचण्यासाठीं भारतीय समाजवादी चळवळीच्या कार्यकर्त्यांनीं आतां तत्परतेनें कार्य-प्रवण झालें पाहिजे. ''

[ **फेनर ब्राकवे** यांच्या एका लेखाचा स्वैर अनुवाद. अनुवादक—श्री. **क. श्री. काळे,** तासगांव. ]

## २ अणुबॉंबचें गौप्य कसें राखलें गेलें ?

जपानवर अणुबॉंब पडण्यापूर्वीं त्याच्या उत्पादनाची तयारी अमेरिकेंतील कारखान्यांतून होत होती. अणुबॉंबचा स्फोट जपानवर आणि या युद्धकालीन परम गौप्याचा स्फोट इतर जगावर एकदमच झाला ! अणुबॉंब पडण्यापूर्वीं चार वर्षें त्याच्या उत्पादनाची तयारी अमेरिकन कारखान्यांतून सुरू होती. हें गुपित बोलभांड अमेरिकनांपासून, चिकित्साखोर परराष्ट्रीय लोकांपासून, शत्रूंच्या हेरांपासून कांटेकोरपणें राखण्याकरितां एवढेंच नव्हे तर शत्रूकडील अणुविषयक संशोधनाची बित्तंबातमी काढण्याकरितां जें अणुबॉंब-संरक्षणदल तयार केलें गेलें त्याचा इतिहास बघूं जातां आश्चर्य वाटल्याशिवाय रहात नाहीं. ह्या संरक्षकांना creeps ( अपसर्प ) असें म्हणत. ' या योजनेचें रक्षण करा ' असें ब्रीदवाक्य या अपसर्पांचें असे. या दलाचा संघटक ले. जॉन लॅन्सडेल हा होता. अणु, युरेनिअम, गुप्तास्त्रें या शब्दांचा उच्चारही करावयाची मनाई होती. एक सांकेतिक भाषाच याबाबत तयार केली गेली. ॲटम्सना ' टाप्स ' आणि ' बॉंब 'ला ' बोट ' हीं नांवें मिळालीं. अधिक सुरक्षितता रहावी म्हणून उत्पादनाचे कारखाने ओक् रिज ( टेनेसी ), लॉस ॲलमास ( न्यू मेक्सिको ), हॅनफर्ड ( वाशिंग्टन ) अशा निरनिराळ्या ठिकाणीं विखुरलेले होते. सुरक्षिततेकरितां कडेकोट बंदोबस्त होता. नक्कल करतांना वापरलेल्या प्रत्येक कार्बन कागदाची यादी ठेविली होती. कोणताही सुटा कागदाचा चिटोरा नजरेंतून सुटत नसे. या कामांत असलेल्या लोकांना अहोरात्र कानींकपाळीं व्याख्यानें, चलचित्रपट, फलक या द्वारां बिंबविलें जात असे कीं, '' बोंबलूं नका. ( Do not be blaboteurs ).'' प्रेसिडेंट रूझवेल्टनाही वेळोवेळीं या संशोधनाच्या प्रगतीचे अहवाल सादर केले जात. पण स्वतः युद्धमंत्री हेन्री स्टिम्सन ते अहवाल जातीनें घेऊन जात असत, प्रे. रूझवेल्ट वाचीपर्यंत तेथेंच थांबत व मग स्वतःच परत घेऊन जात. एकदां कारखान्यांत काम करणाऱ्यांच्या अंगावर एकाएकीं फोड उभारून आले. त्या माणसांनीं कारखान्याच्या डॉक्टरांकडे जाण्याऐवजीं खाजगी डॉक्टरांचा सल्ला घेतला. त्या डॉक्टरांनीं सांगितलें कीं हे फोड रेडिओ—ॲक्टिव्हिटीमुळें असावेत ! झालें ! संरक्षणदलांना—अपसर्पांना हें कामच झालें ! त्यांनीं प्रत्येक डॉक्टराकडे जाऊन तें गुपित ठेविण्याची शपथ त्यांच्याकडून घेवविली. सहा लक्ष लोकांचा या ना त्यावेळीं या अणुबॉंब-उत्पादनाशीं संबंध आला असेल. परंतु नवल हें कीं, शत्रूला त्यांत घातपात उत्पन्न करण्याइतकी बातमी लागली नाहीं.

ज्यांच्या हातीं संशोधनाचीं व निर्मितीचीं सूत्रें, असे जे शास्त्रज्ञ त्यांच्याकडून गौप्यस्फोट होऊं नये म्हणून सक्त काळजी घेतली गेली. मोठमोठे पदार्थ-विज्ञानशास्त्रज्ञ ( Nuclear Physicists ) कोठें आहेत याच्या पाळतीवर जर्मनी होताच. म्हणून शास्त्रज्ञांनीं टोपण नांवें धारण केलीं. डॉ. कॉम्प्टननें ' कोमस, ' डॉ. एन्रिको फेर्मीनें ' हेन्री फार्मर ', जगप्रसिद्ध नील्स बोहर यानें ' निकोलस बेकर ' अशी












नांवें धारण केली. ब्रिटिश पदार्थविज्ञानी ( Physicist ) ॲलन मे यानें रशियन हेराला युरेनियमचे कांहीं नमुने व कामाची बातमी दिली, हें 'अप र्पोना' कळलें. त्याबरोबर पुढें कारखान्याच्या परिसरांतही पाऊल ठेविण्याचा मे यास मज्जाव झाला. पुढें ब्रिटिश अधिकाऱ्यांनीं मेला पकडलें. मेनें गुन्हा कबूल केला. त्याला १० वर्षांची कैद झाली.

हिट्लरचाही 'अणुबॉंब' विषयीं शोध चालू होता. व तो शोध कोठपर्यंत आला आहे याची दोस्तांना चिंताच होती. एकदां अशी बातमी लागली कीं, दक्षिण जर्मनीमध्यें होहेन्झोलर्न भागांत बिसिंजन या गांवीं एका प्रयोगशाळेंत गुप्त प्रयोग चालू असून तेथें स्फोटक बॉंब तयार होत आहे! त्याचा जारीनें तपास सुरू झाला. बिसिंजनजवळ डॉ. हायझेनबर्ग हा जर्मनीचा अग्रगण्य परमाणुशास्त्रज्ञ ( Nuclear Physicist ) काम करीत आहे असें हेरांनीं हेरलें. १९४५च्या मार्चच्या सुमारास दोस्तराष्ट्रांनीं थेट जर्मनीवर आक्रमण आरंभिलें. तेव्हां अणुबॉंब-संरक्षणदलाचा प्रमुख लॅन्सडेल यानें सांगितलें कीं "पहिला मोर्चा होहेन्झालर्न भागावर वळवा. आधीं तेथील शास्त्रज्ञ आणि त्यांचें संशोधन यांचा कबजा घ्या". त्याप्रमाणें जारीनें तपास सुरू झाला. पॅरिसमधील एक युरेनिअम आणि थोरिअमचा व्यापारी होहेन्झालर्नला पळून गेलेला होता. त्याची 'फाइल' सांपडली! वैमानिकांनी जीं त्या भागाचीं छायाचित्रें घेतलीं त्यांत बिसिंजन गांवाजवळ राबणाऱ्या गुलामांचे कॅम्प्स, मोठमोठे कारखाने, विद्युच्छक्ति वाहून नेणाऱ्या तारांचीं जाळीं दिसलीं! त्याचवेळीं जर्मन नभोवाणीवरून असेंहि जाहीर करण्यांत आलें कीं, 'जर्मनीला अणुबॉंब सांपडला.' खरी वित्तंबातमी शोधून काढण्याचा निर्वाणीचा प्रयत्न सुरू झाला. बिसिंजनपर्यंत दोस्तांचें तज्ज्ञ-संशोधक-पथक येऊन थडकलें! पण त्याची निराशा झाली तरी त्याबरोबर त्याला हायसें वाटलें! ते कारखाने अणुबॉंबचे नव्हते. शेलपासून तेल काढण्याचे होते! ज्यानें युरेनियम परमाणूचा पहिल्यांदा स्फोट करून दाखविला तो शास्त्रज्ञ ऑटो हाह्न हा प्रयोगशाळेंत बसलेला सांपडला. इतरही शास्त्रज्ञ सांपडले. त्यांपैकीं काहींनीं अणुबॉंबचें संशोधन केलेलें जर्मनीपासूनच गुप्त ठेविलें होतें. तें त्यांनीं अमेरिकनांना दिलें. मौज अशी कीं त्यांचें संशोधन पाहतां तें अगदींच प्राथमिक अवस्थेंतलें दिसून आलें. जर्मन शास्त्रज्ञांची अशी खात्री होती कीं, त्यांच्या संशोधनाच्या मानानें दोस्तांच्या शास्त्रज्ञांचें संशोधन खूपच मागें असावें! अणुबॉंब संरक्षणदलाची गौप्यरक्षक कामगिरी किती यशस्वी झाली त्याचा यापेक्षां दुसरा पुरावा कशास पाहिजे!

— **रीडर्स डायजेस्ट** १९४७ (डिसेंबर) यांतील एका लेखाचा सारांश.

## ३. रशियनांना अमेरिकनांविषयीं काय वाटतें?

फ्रेडरिक सी. बर्गहूर्न, अमेरिकन प्रोफेसर, यांनीं 'फारन अफेअर्स' या नियतकालिकाच्या जानेवारीच्या अंकांत वरील विषयावर लेख लिहिला आहे. ते १९४२ ते १९४७ या अवधींत मास्को येथें अमेरिकन वकिलातींत वृत्तपत्रीय खात्याशीं संलग्न ( attache ) म्हणून काम करीत होते. त्यांच्या लेखाचा सारांश खालीं दिला आहे—

'गेलीं दोन वर्षें रशियांतील अधिकारारूढ अशा कम्युनिस्ट पक्षानें पाश्चात्य भांडवलशाही संस्कृति आणि तत्त्वप्रणाली यांविरुद्ध प्रचाराची मोहीम सुरू केली आहे. वृत्तपत्रें, नभोवाणीकेन्द्रें, वाङ्मय, रंगभूमि यांमधून पाश्चात्य विशेषतः अमेरिकन जीवन हें भ्रष्ट, अनीतिमय आणि अधःपातमय रंगविण्याचा पद्धतशीर प्रयत्न होत आहे. कॉमिन्टर्नचा 'कामिन्फार्म' या नांवानें पुनरवतार हें त्या पद्धतशीर प्रचाराचें एक अत्यंत महत्त्वाचें असें गमक आहे.

अधिकारारूढ पक्षामधील वरच्या अधिकाऱ्यांची परराष्ट्रीय वकीलातींतील माणसाला गांठ घेणें अत्यंत दूरापास्त असतें. या अधिकाऱ्यांच्या दृष्टीनें परराष्ट्रीय वकीलातींतील मनुष्य म्हणजे अस्पृश्यच—अर्थात् मानमरातबानें ठेविलेला अस्पृश्य—असें म्हणतां येईल. या पक्षनिष्ठ अधिकाऱ्यांच्या वर्चस्वाखालीं चाललेल्या प्रचारतंत्राच्या द्वारां अमेरिकन जीवनाविरुद्ध अपप्रचाराचा जो ढोल सुरू आहे, त्यापुढें अमेरिकनांच्या बाजूनें चाललेल्या प्रचाराची टिमकी रशियन लोकांना ऐकूं येणें दिवसेंदिवस कठिणच जाईल.

पण ही पक्षशाहींतील लोकांची मनोवृत्ति लक्षांत न घेतां रशियांतील साध्या नागरिकाला अमेरिकनां-

विषयीं काय वाटतें याचा जर विचार करूं लागलों तर अमेरिकनांविषयीं त्यांच्या मनांत अजून सदिच्छा आणि स्नेह यांचें बरेंच संचित असलेलें आढळून येईल.

युद्धकाळीं दुसऱ्या महायुद्धाच्या वेळीं ऐन दोस्तीच्या काळांत रशियन लोकांचा आणि अमेरिकनांचा जो निकट संबंध आला, जी घसरट झाली, त्यामुळें अमेरिकन लोक केवळ सहानुभूतिपूर्णच नव्हे तर अडचणीला उपयोगी पडणारे, उदार हृदयाचे, बलाढ्य असे स्नेही आहेत हें रशियन लोकांना पटलेलें आहे. रणसाहित्य आणि अन्नद्रव्य यांचा अमेरिकनांनीं युद्धकाळीं उमाप पुरवठा केला. अमेरिकन सैनिकांनीं युद्धआघाडीवर पराक्रमही गाजवला. त्याबद्दल अर्थात् पक्षनिष्ठ अधिकाऱ्यांनीं अमेरिकेला श्रेय तर दिलेंच नाहीं उलट अमेरिकेविरुद्ध असा प्रचार चालविला कीं 'आम्ही इकडे रक्ताचे पाट वहावत असतांना, या अमेरिकन लोकांनीं आपली तुंबडी भरली!' तरी पण अमेरिकन लोकांच्या मदतीचीं चिन्हें इतकीं जागोजाग पसरलेलीं आहेत कीं तीं दृष्टीआड करणें सामान्य जनतेला कठिण गेलें. ट्रॅन्ससैबिरिअन आणि इतर रेल्वेवरून अमेरिकेंत तयार झालेले रणगाडे, विमानें, आगगाडीचीं एंजिनें, अंड्यांची पावडर, गव्हाचा आटा, साखर, तुशोंका (सोव्हिएट लोकांना विशेष पसंत म्हणून त्यांच्या सांगण्यावरून मुद्दाम बनविलेलें एक स्वादिष्ट मांस), चामड्याचे कोट, शिपायाच्या गणवेषाचें कापड वगैरे अमेरिकन मालाची सर्वत्र नेआण व वहातूक चालू होती. १९४६ त मेमध्यें व्हलाडिव्होस्टॉक येथें भरलेल्या लष्करी परेडमध्यें जे ६० मोटारगाडे होते त्यांपैकीं ५९ अमेरिकेमध्यें तयार झालेले होते!

युध्दकाळीं अमेरिकन लोकांचा जो रशियन लोकांशीं—सामान्य जनतेशीं संबंध आला त्यावरून अमेरिकन लोकांविषयीं रशियनांचें अनुकूल मत झालेलें मला स्पष्ट दिसून आलें. अमेरिकनांविषयीं रशियनांना काय वाटतें? अमेरिकन लोक त्यांना सरळ मनाचे निष्कपट वाटतात. साधे, निष्कपट याला रशियन शब्द Prostoi असा आहे. अमेरिकन वकिलातीमधील एक अधिकारी मोटारचें एक चाक हातांनीं वाहून नेत असतांना बघून रशियन लोकांना मोठें कौतुक वाटलेलें मी पाहिलें आहे. अमेरिकनांच्या कार्यतत्परतेविषयींहि रशियनांना आदर असून स्टॅलिननें देखील या गुणाची (रशियन भाषेंत त्याला delovitost म्हणतात) तारीफ केली आहे.

तसेंच अमेरिकन लोकांच्या मर्यादाशीलतेबद्दल रशियन लोकांना फार कौतुक वाटतें. दिसायला ही गोष्ट साधी आहे. परंतु सोव्हिएट लोकांनीं त्याचा इतका कटाक्षानें उल्लेख केलेला बघून मला नवल वाटलें! विशेषतः स्त्रियांच्या मनावर या मर्यादाशीलपणाची, या नम्रतेची विशेष छाप पडलेली दिसून आली. हा गुण त्यांच्या नजरेंत प्रामुख्यानें भरण्याचें कारण मला वाटतें असें असावें कीं, मर्यादाशीलपणा किंवा नम्रता यांमध्यें दुसऱ्या व्यक्तीविषयीं जी आदरभावना गर्भित असते, ती त्यांना विशेष मनोज्ञ वाटली असावी.

मास्कोमधील लोकांना अमेरिकनांविषयीं आणखी कांहीं जर ठसठशीतपणें वाटत असेल तर अमेरिकन लोकांच्या समृद्ध रहाणीविषयीं. मास्कोमधील उद्यानांतून जर एखादा अमेरिकन दिसला तर त्याच्याभोंवतीं लोक गोळा होतात व त्याला विचारतात "अमेरिकेंत कसें काय आहे? यापेक्षांही चांगलें असेल, होय ना!". मी १९४७च्या फेब्रुवारींत कॉकेशसमध्यें प्रवास करीत असतांना मला भेटलेल्या एका सोव्हिएट लष्करी अधिकाऱ्याच्या पत्नीचे उद्गार मला आठवतात. ती म्हणाली, "अमेरिकन बोलपट पाहून मला आनंदही होतो आणि दुःखही होतें. तें पाहून आमच्या आणि तुमच्या जीवनांत किती मोठा तफावत आहे याची जाणीव होते व मला फार वाईट वाटतें." आपण जर एखाद्या रशियन मनुष्याला विचारलें-- "कां हो शेवटीं तुमचा कम्युनिझम केव्हां प्रस्थापित होईल?" तो उत्तर देतो "एक हजार वर्षांनीं". एका वृद्ध गृहस्थानें तर एका म्हणीचा अनुवाद करून सांगितला. "गवत उगवेपर्यंत, घोडाच मरून जाणार!" रशियन लोकांच्या या मताचा आपल्याला एवढा पदोपदीं अनुभव येतो कीं त्यांच्या दृष्टीनें जीं सुखमय रहाणीचीं मनोराज्यें आहेत आणि जीं सत्यसृष्टींत यायची आशा नाहीं अशा मनोराज्यांचें प्रतिक म्हणजे अमेरिकन जीवन होय.








अधिकारारूढ पक्षाशीं जे लोक संलग्न आहेत त्यांनाहि अमेरिकेची समृध्दता कबूल करावी लागतेच. पण ते ठासून सांगतात--" आणखी १५-२० वर्षांत अमेरिकेसारखी आमची रहाणी करून दाखवूं." शिवाय ते विचारतात--" अमेरिकेंत नीग्रोंना या समृध्दतेंत कुठे सहभागी होतां येतें !"

मला एक रोमहर्षक प्रसंग आठवतो. दुसऱ्या महायुध्दाच्या शेवटीं शेवटीं नार्मन्डीमध्यें अमेरिकन आणि ब्रिटिश सैनिकांनीं उतरून आघाडी उघडल्याचें कळल्याबरोबर मॉस्कोमधील लोकांना काय हर्ष झाला, म्हणतां ! त्यावेळेला रस्त्यांमधून बगीच्यांमधून आम्हीं जेथें जेथें होतों तेथें तेथें आमच्यावर अभिनंदनाचा वर्षाव झाला. कांहीं रशियन लोकांना तर गहिंवर येऊन ते भावनेच्या भरांत रडूं लागले ! पुढें मे ९ या V. E. दिनाच्या दिवशीं तर यावरही कडी झाली ! रशियन लोक अमेरिकन आणि ब्रिटिश लोकांना डोक्यावर घेऊन नाचले ! आज तो प्रसंग आठवला तर जसा आनंद तसा विषादही वाटतो. विषाद अशाकरितां कीं रशियन लोकांच्या इतर राष्ट्रांतील नागरिकांशीं मोकळेपणानें वागण्याचा तो प्रसंग शेवटचाच होता. त्यानंतर त्यांना इतर राष्ट्रिकांशीं मोकळेपणानें संबंध ठेवण्यास सरकारकडूनच मनाई केली गेली !

अमेरिकन राज्यपद्धति, निवडणूकपद्धति यांचें रशियनांना वावडें आहे, त्यांना अमेरिकन द्विपक्ष राज्यपद्धति समजूं शकत नाहीं. युद्धकाळीं अमेरिकेंत अध्यक्षांची निवडणूक होणार हें ऐकून कांहीं रशियनांना किती आश्चर्य व भीति वाटली हें मला आठवतें. रुझवेल्टच्या निवडणुकीनंतर एका लष्करी अधिकाऱ्यानें मला विचारलेलें आठवतें कीं, " कांहो, रुझवेल्टला तुम्ही कायमचे अध्यक्ष निवडलेत ना !"

हल्लीं गेलीं १।२ वर्षें सोव्हिएटमध्यें अमेरिकेविरुद्ध होणाऱ्या प्रचारतंत्राला जर अमेरिकेनें तोंड द्यावयाचें असेल तर सोव्हिएटविरुद्ध उलट प्रचार करून नव्हे तर शांत आणि धिमेपणानें वस्तुस्थिति समजावून सांगून, उगीच हस्तक्षेप करावयाचें टाळूनच. अमेरिकन रहाणीनें रशियन लोकांच्या सुखस्वप्नांत इतकें खोल स्थान मिळविलें आहे कीं, जर आपण ' सर्वलोकांकरितां सुखसंपादन— the pursuit of happiness for all peoples ' हा आपला ध्येयसंदेश जर खरोखरी प्रस्तुत केला तर रशियन लोक आपला द्वेष करणें शक्य नाहीं याबद्दल खात्री आहे.

**—फॉरेन अफेअर्स**, जानेवारी १९४८

## ४ महाराष्ट्राची विशिष्ट वृत्ति

" गांधीजींचा खून जरी एका व्यक्तीनें केला असला तरी त्याच्यामागें संबंध महाराष्ट्राची एक विशिष्ट वृत्ति होती असें आढळून येतें. या वृत्तीपासून कुणीहि सुटलेला नाहीं. महाराष्ट्राच्या स्वभावांत शिरलेल्या विकृतीचाच हा परिपाक आहे. महाराष्ट्रांतील लोकांमध्यें जो हा दोष शिरला तो फक्त गेल्या वीसपंचवीस वर्षांतील नसून अडीचशेंतीनशें वर्षांपासून आहे. ज्ञानदेवाचा महाराष्ट्र आज राहिलेला नाहीं. आपण दिल्लीचें तख्त कसें फोडलें, सुरत कशी लुटली, बंगालवर स्वाऱ्या कशा केल्या यांचींच वर्णनें करून आपण आपल्या शौर्याचे गोडवे गातो. परंतु वस्तुतः शौर्य हा कांहीं मूलभूत सद्गुण नव्हे कीं, तेवढा असला म्हणजे पुरे. त्याला आपण फाजील महत्त्व मुळींच देतां कामा नये. मी जेव्हां प्रथम गुजराथेंत जाऊन काम करूं लागलों तेव्हां पुष्कळ महाराष्ट्रीयांनीं मला विचारलें कीं, ' तुम्ही महाराष्ट्राची सेवा न करितां गुजराथची सेवा कां करितां ? '. त्यावेळीं मी त्यांना असें सांगितलें कीं, ' आपण महाराष्ट्रीयांनीं गुजराथच्या लोकांशीं वाईट प्रकारें वागून जें पाप केलें आहे, त्याचें प्रायश्चित्त घेण्यासाठीं ही गुजरातची सेवा करीत आहे. ही सेवा करून वस्तुतः मी महाराष्ट्राचीच सेवा करीत आहे '.

आपल्यामध्यें ही साम्राज्यवादी वृत्ति कशी दृढमूल झाली आहे याचें उदाहरण म्हणून असें सांगतां येईल कीं, संबंध हिंदुस्थानांत फक्त महाराष्ट्र हाच एक असा प्रांत आहे कीं, जेथील भंग्यांची मातृभाषा स्थानिक भाषा नाहीं. गुजरातेंतील भंग्यांची मातृभाषा गुजराती आहे, कर्नाटकांतील भंग्यांची भाषा कानडी आहे; परंतु महाराष्ट्रांतील भंग्यांची मातृभाषा मात्र गुजराती अथवा हिंदी आहे. याचा अर्थ आपण इतर प्रांतांतून हें घाणेरडें काम करण्यासाठीं लोक पकडून आणले आणि त्यांना भंग्याचें काम करावयास लावलें. ही एक प्रकारची गुलामगिरीच आपण निर्माण केली. हा दोष आपण जितक्या लवकर काढून टाकूं तितकें चांगलें.








महाराष्ट्राचा दुसरा महत्त्वाचा दोष म्हणजे आपण ऐक्यपूजक नसून अैक्यभंजक आहोंत. आपली स्थिति पुराणकालीन यादवांसारखी आहे. त्यांना असा शाप होता कीं, तुम्ही नेहमींच विभागत जाल व तुम्ही एकाचे दोन आणि दोहोंचे चार, चाराचे आठ होत जाल. परंतु आठाचे चार, चाराचे दोन अथवा दोहोंचा एक होऊं शकणार नाहीं. याप्रमाणेंच महाराष्ट्रांत दोन माणसें काम करूं लागलीं कीं, त्यांचे दोन पक्ष पडतात. शिवाजीला दोन मुलगे होते असें ऐकल्याबरोबर आपण सांगूं शकतों कीं, त्यांच्यांत भांडणें झालींच असलीं पाहिजेत. रामदासांना दोन शिष्य होते असें ऐकलें कीं, त्यांच्यांत दोन पंथ झाले असलेच पाहिजेत, असें आपण बिनचूक निदान करूं शकतो. फर्ग्युसन कॉलेजचे दोन विद्यार्थी असले म्हणजे त्यांच्यांत दोन तट पडणारच हें जणूं ठरलेलेंच असायचें. या कुचक्रांतून सुटका करून घ्यावयाची असल्यास आपण एक मूलभूत सिद्धांत स्वीकारला पाहिजे. तो असा कीं, सत्य व अहिंसा मानणाऱ्या सर्वांशीं सहकार्य करण्यास आपण तयार झालें पाहिजे. मग ती व्यक्ति अथवा संस्था हिंदुराष्ट्राच्या सिद्धान्तावर विश्वास ठेवणारी असली तरी हरकत नाहीं. साधनाची शुद्धता हीच मुख्य गोष्ट मानली पाहिजे." यावर श्री. बाळासाहेब खेर यांनीं असा प्रश्न केला कीं, 'कम्युनिस्ट लोक असें समजतात कीं, आपलें ध्येय साध्य करण्यासाठीं जें कांहीं करावें लागतें तें सर्व शुद्ध व सत्यच असतें. त्यांच्या दृष्टीनें साधनांना महत्त्व नाहीं साध्यच महत्त्वाचें आहे. त्यांच्याशीं आपण सहकार्य करावें काय ?' यावर विनोबांनीं उत्तर दिलें कीं, "सत्य हें प्रत्येकानें अनुभवावयाचें असतें. यामुळें एकाचें सत्य दुसऱ्याच्या सत्याशीं मेळ राखीत नाहीं. अशा वेळीं ज्यांच्याशीं आपलें सत्य जुळणार नाहीं त्यांच्याशीं आपणाला सहकार्य करतां येणार नाहीं."

**आचार्य विनोबा,** वर्धा येथील रचनात्मक कार्यकर्त्यांच्या संमेलनांत (१३।३।४८) केलेल्या भाषणामधून.

## ५ नैतिक मूल्यांची आवश्यकता

"मी ज्यावेळेस, 'स्पिरिच्युअल रीजनरेशन' ची आवश्यकता प्रतिपादन केली व हें कार्य करण्यासाठीं रमण महर्षि, श्री अरविंद यांना आवाहन केलें त्यावेळीं मी समाजवादाचा द्रोह केला आणि पक्षाची बदनामी केली अशी कित्येकांकडून टीका करण्यांत आली. माझ्या म्हणण्याचा आशय नीट समजून न घेतां हे आक्षेप घेण्यांत आले आहेत. माझ्या मनांत 'स्पिरिच्युअल रीजनरेशन' म्हणजे आध्यात्मवाद ही कल्पना केव्हांहि नव्हती. 'स्पिरिच्युअल रीजनरेशन्' व्हावें असें जेव्हां मी म्हणतों तेव्हां समाजांत कांहीं नैतिक मूल्यें असणें अवश्य आहे एवढाच माझ्या म्हणण्याचा अर्थ होतो. ह्या नैतिक मूल्यांमुळें सामान्य माणसाला भल्या व बुऱ्या गोष्टींतील फरक कळून येईल. केवळ भौतिकवादावर आपण आतांपर्यंत भर दिला; परंतु प्रतिगामी शक्तींचा मुकाबला करण्यास आपण अपुरे पडलों. बुद्धिवाद किंवा जडवाद ज्याला समजूं शकतो अशा मध्यमवर्गांतहि राष्ट्रवादी आणि जातीयवादी अशा दोन प्रवृत्ती होत्या. जातीयवादाचें जहर फैलावण्यास हाच मध्यम वर्ग कारणीभूत झाला. ह्या विषबीजांचें उन्मूलन केवळ वर्ग–विग्रहाचा तोडगा सुचविणारे समाजवादी करूं शकणार नाहींत. देशांत पसरलेल्या जातीयतेच्या विषानें केवळ राजकारणच नव्हे तर जीवनाचीं सर्वक्षेत्रें व्यापून टाकलीं आहेत. अशा आणीबाणीच्या वेळीं मानवतेच्या सर्व उपासकांचें आपण साहाय्य घेतलें पाहिजे. हें साहाय्य मिळून विशुद्ध वातावरण निर्माण झाल्याशिवाय समाजवाद यशस्वी होणार नाहीं. पाकिस्तानांत समाजवादाच्या अस्तित्वाची कल्पनाहि करणें आज कठीण आहे. आपल्या राष्ट्रांत मध्यम वर्गांतील व बहुजनसमाजांतील असे अनेक लोक आहेत कीं, ज्यांच्या मनावर रमण महर्षि किंवा श्री अरविंद यांच्या शिकवणुकीचा प्रभाव पडूं शकेल. मानवतेचीं मूल्यें निर्माण करण्यास यांची मदत घेण्यांत गैर तें काय ? नैतिक क्षेत्रांत यांनीं मार्गदर्शन केलें तर समाजवाद धोक्यांत कसा येईल हें मला समजत नाहीं. त्यांनीं समाजवादाच्या प्रस्थापनेचें नेतृत्व करावें असें मी केव्हांहि म्हटलें नाहीं. नीतिमूल्यांचा स्वीकार केल्यानें आपण ट्रस्टीशिप्च्या कल्पनेकडे जाऊं असें मला मुळींच वाटत नाहीं. आज राष्ट्रांत आपल्याला एक प्रचंड सांस्कृतिक आंदोलन निर्माण केलें पाहिजे व त्यासाठीं भिन्न भिन्न क्षेत्रांतील, भिन्न विचारांची परंतु मानवतेच्या








मी शांततामय लोकशाही मार्गावर भर दिल्यानें पक्षाला मवाळ सनदशीर स्वरूप येत आहे असें कित्येकांना वाटतें. आपण सनदशीर काम केलें पाहिजे परंतु सनदशीर मार्गानें राजसत्ता काबीज करून तिच्याच द्वारां सर्व कांहीं करणें शक्य आहे हें मानतां कामा नये. जन–संघटनेच्या द्वारां जनतेंत नवीन शक्ती निर्माण केल्या तरच जनतेला राज्ययंत्राचा आपल्या हिताकरितां उपयोग करतां येईल. जनतां तयार नसेल तर कायदे निष्प्रभ ठरतील. माझा सनदशीर समाजवादावर विश्वास नाहीं. मी लोकसत्ताक समाजवादाचा पुरस्कर्ता आहे. कामगार–किसानांमध्यें विधायक कार्य करून राष्ट्रीयीकरणाचा स्वीकार करण्यास त्यांना समर्थ बनविणें हाच खरा लोकतांत्रिक समाजवाद होय. हें कार्य केवळ एकांगी राजकीय असून चालणार नाहीं. जीवनाच्या सर्व क्षेत्रांना व्यापून टाकणारें समाजवादी आंदोलन आपण निर्माण केलें पाहिजे. मूलभूत मुद्यांबद्दल एकवाक्यता असणारीं माणसें एकत्र आणलीं पाहिजेल. समाजवाद्यांच्या शिकवणुकीनें लोकांना राजकीय व आर्थिक अन्यायाची जाणीव होईल; परंतु त्यांच्या नैतिक अधःपाताची जाणीव करून देण्यास श्री अरविंदासारख्या व्यक्ती आपल्याला सहायक ठरतील. केवळ समाजवादाच्या मंत्रानें आपण मानवतेचा होम करणारें हें विष दूर करूं अशी मला घमेंड नाहीं. हा समाजवादाचा सवाल नाहीं; मानवतेचा सवाल आहे.

साध्य व साधनें या बाबतींतील माझ्या विधानांवर टीका करण्यांत आली आहे. साधनें म्हणजेच साध्य नव्हें हें मला मान्य आहे; परंतु उज्ज्वल ध्येयाप्रत जाण्यासाठीं विशुद्ध मार्गांचा अवलंब केला पाहिजे असा माझा आग्रह आहे. साध्यासाठीं कोणतींहि साधनें वापरलीं तरी चालतील हें क्रांति-तंत्र म्हणून नांवाजलेलें तत्त्व चूक आहे. साधन चांगलें कोणतें ह्याचा मानदंड ठरविणें कठीण आहे. परंतु जें साधन वाईट आहे हें आपण जाणतों तें तरी वापरणार नाहीं एवढें आपण निश्चित करूं या. ''

श्री· जयप्रकाश नारायण
नाशिक येथील भाषणामधून
'जनवाणी' ता. २८।३।४८

———

## संघटना म्हणजे बंधन—

" संघटना म्हणजे बंधन. आणि बंधनांत राहणें म्हणजे विकास कुंठविणें. जें विकास कुंठवितें तें मानवी कल्याणाचें कधींच होऊं शकत नाहीं. म्हणून संघटनाच नसावी असें मला वाटतें. आणि गांधींच्या नांवावर तर ती मुळींच नसावी. खरा गांधीवादी कोण आणि खोटा गांधीवादी कोण हें कोण ठरविणार ? हें ठरविण्याचा कोणालाहि अधिकार नाहीं. गांधीजींचे सिद्धान्त असे होते आणि तसे होते, असें मोठ्या आविर्भावानें सांगणें आणि इतरांनीं ते मान्य न केल्यास त्यांच्यावर तुटून पडणें अथवा त्यांना तुच्छ लेखणें हा विकासाचा मार्ग नव्हे. सिद्धान्त स्वयंसिद्ध असतात, स्वयंशक्तिशाली असतात, कोणा एका महनीय विभूतीच्या नांवाचा आधार घेऊन ते उच्चारले म्हणजे कांहीं त्यांना अर्थ प्राप्त होत नसतो. सिद्धान्त कांहीं गांधीजींच्या बापाचे नव्हते, ते स्वयंसिद्ध व सर्वांचे होण्यासारखे आहेत. ज्या प्रमाणांत ते आपण व्यक्तिशः आत्मसात् करूं व आपल्या आचारविचारांतून त्यांचा आविष्कार करूं, त्या प्रमाणापुरतेच ते आपले होत असतात. आणि जेवढ्या प्रमाणांत ते सिद्धान्त आपण आपले करूं शकतों, त्या प्रमाणांतच ते आपल्यापुरते खरे ठरत असतात. व्यक्तिशः आपण आपल्या स्वतःच्या आचार-विचारांतून जर ते सिद्धान्त प्रकट करूं शकलों, तरच ते जिवंत राहतील; नाहींतर नामशेष होऊन जातील. "—

आचार्य विनोबा—(१३–३–४८)

वर्ष पहिलें
अंक नववा

नवभारत

जून
१९४८

## या अंकांतील जाहिराती व जाहिरातदार

सु. रा. ग्रंथमाला : जे. ॲण्ड. एम्. को. : डॉ. पुरोहित फार्मसी : संयुक्त महाराष्ट्र परिषद्

# औद्योगिक-वृत्त विशेष

( पॅरामाऊंट पब्लिसिटी सिंडिकेट लि. मार्फत )

भिवंडी येथील **' दांडेकर मशीन वर्क्स'**चे मालक श्री. दादासाहेब दांडेकर व व्यवस्थापक श्री. बसंतराव देवधर हे यंत्रसामुग्री खरेदी करण्यासाठीं इंग्लंडला रवाना झाले.

**इंडियन प्रायमरी सेल्स कॉर्पोरेशन लि.** ( पीपल्स बिल्डिंग, फेरोजशहा मेहता रोड, मुंबई ) ही पांच लक्ष रु. भांडवलाची कंपनी प्रायमरी सेल्सचें उत्पादन व व्यापार करण्यासाठीं स्थापन झाली आहे. श्री. रा. गं. लाटे कंपनीचे पहिले डायरेक्टर आहेत.

नवसारी येथें जंगलांत **कागदाचा कारखाना** काढण्याची योजना बडोदें सरकारनें अंगिकारली असून कागद विषयक तज्ज्ञ श्री. चौधरी हें काम हातीं घेत आहेत.

**ओरायन इंजिनीअरिंग वर्क्स** ( ॲश लेन, माटुंगा ) ही पांच लक्ष रु. भांडवलाची कंपनी स्थापन झाली असून श्री. शंकर संभाजी गांगल हे तिचे पहिले डायरेक्टर आहेत.

**लोकसत्ता वीव्हिंग मिल,** ( लिंब, ता. सातारा ) ही गिरणी सातारा शहरांत यापुढें कापडाचें उत्पादन करणार आहे.

**श्री. कृषिसाधन लि.** ( आग्रा रोड, नाशिक ) ही पांच लक्ष रु. अधिकृत भांडवलाची कंपनी शेतीच्या उपयोगी यंत्रसामुग्री तयार करण्यासाठीं स्थापन झाली आहे. या कारखान्यांत शस्त्रास्त्रें तयार करण्यास परवानगी द्यावी म्हणून मुंबई सरकारकडे कंपनीनें विनंति केली आहे.

**आगपेट्यांच्या उत्पादनांत** हिंदुस्थानांत दीडशें कारखाने गुंतले असले तरीहि कित्येकदां बाजारांत त्यांची चणचण भासते. सुमारें १६००० कामगार या कारखान्यांत गुंतले असून मुंबई इलाख्यांत आगपेट्यांचे चार मोठे कारखाने आहेत. आगपेट्यांना चालणारें हिंदी लाकूड ज्या भागांत मिळेल तेथें आणखी कांहीं कारखाने काढण्यास मागणीचे दृष्टीनें वाव आहे.

लोणी ( जि. अहमदनगर ) येथें सहकारी तत्त्वांवर आणखी एक **साखर कारखाना** काढण्यास सरकारनें परवानगी दिली आहे.

**मे. पांडुरंग ॲग्रिकल्चरल् प्रॉडक्ट्स्** (कुरोली व्हाया कुर्डूवाडी ) यांनीं रु. ४, ३७, ७०० चें भांडवल विक्रीस काढलें. त्यांपैकीं रु. ३, २६,५०० भांडवल वसूल झालें आहे. कंपनी वाढत्या व्यापासाठीं मुदतीच्या ठेवी घेत असून तिनें व्याजाचा दर ४॥ ते ६ टक्के ठेवला आहे.

**दि अवधूत महाराष्ट्र शुगर केन इन्डस्ट्रीज लि.** ( पंढरपूर ) यांनी एका वर्षांत माळाशिरस तालुक्यांत १४०० एकर जमीन मिळविली असून १०० एकर जमीनींत उसाच्या लागवडीची तयारी चालू आहे.

उत्पादनवाढीकरितां यंत्रसामुग्री पुरविण्यासाठीं **पॅको इंजिनीअरिंग कंपनी** ( लक्ष्मीपुरी, कोल्हापूर ) ही दहा लाख रु. भांडवलाची कंपनी स्थापन झाली असून मे. पोवार, आतिग्रे, कोठावळे आणि कंपनी हे या कंपनीचे मॅनेजिंग एजन्ट्स् आहेत.

**मागोरा केमिकल कंपनी लि.** ( हिराबाग, पुणें २ ) यांनीं लिव्हरसूप तयार करून पुण्यांत व








बाहेरगांवीं तें ताजें विकण्याचा उपक्रम चालू केला आहे. हा उत्तम व शास्त्रोक्त माल पुरविण्यानें जनतेची मोठी गरज भागणार आहे.

**बटाट्यापासून पॉवर अल्कोहोल** तयार करण्याचा उपक्रम उटकमंड येथील कोट्टी ब्रूअरींत करण्यांत येणार आहे. पेट्रोल टंचाईच्या कालांत बटाट्यांच्या या स्वरूपाचा उपयोग उपयुक्त ठरेल.

**वेस्टर्न इंडिया ट्रस्टी अँड एक्झिक्यूटर** कं. लि. (सातारा) चे मॅनेजर श्री. शि. गो. भावे, एल् एल् बी. हे ट्रस्टी व एक्झिक्यूटररचें काम व्यक्तीतर्फे करण्यापेक्षां सुप्रतिष्ठित व्यापारी संस्थेतर्फे व्हावें, या तत्त्वाचा प्रचार करण्यासाठीं महाराष्ट्रांत दौऱ्यावर निघाले आहेत. पुणें पत्रकार संघाला त्यांनीं कंपनीच्या कार्यासंबंधीं उद्‌बोधक माहिती दिली. ही योजना लोकप्रिय झाल्यास महाराष्ट्राच्या अर्थकारणास पद्धतशीरपणा येणार आहे.

**दि औंध म्युच्युअल लाईफ अॅशु. सोसायटी लि.** (लक्ष्मीरोड, पुणें २) यांनीं १९४७ सालीं रु. ५,४५,५०० चें विम्याचें काम केलें. कंपनीचे मॅ. डायरेक्टर श्री. वि. गो. जोशी यांच्या इंग्लंडमधील विमाव्यवसायाच्या निरिक्षणाचा उपयोग कंपनीच्या कार्यपद्धतींत सुधारणा करण्यास होईल.

**पॅरॉमाउन्ट पब्लिसिटी सिंडिकेट लि.** (४८१ शनवार, पुणें २) यांनीं स्वतःचें प्रोसेस ब्लॉक डिपार्टमेन्ट सुरू केलें आहे. लाईन, हाफ-टोन्, दुरंगी व तिरंगी ब्लॉक्स् परदेशांत शिक्षण घेतलेल्या तज्ज्ञांचे देखरेखीखालीं या खात्यांत तयार होत असून मुंबईच्या दर्जाचें काम ग्राहकांना माफक दरांत मिळणार आहे.

**जयहिंद लिमिटेड** (कोल्हापूर) या नांवाची दोन लाख रु. भांडवलाची कंपनी मुद्रण-प्रकाशनाकरतां स्थापन झाली असून कंपनीच्या मॅनेजिंग एजंटांत प्रो. मा. भी. सोलापुरे व श्री. पाटील ही अनुभवी मंडळी आहेत.

**ब्रिटिश औद्योगिक प्रदर्शनांत** मुंबईचे आंबे तसेंच आंबावडी हेही पदार्थ ठेवण्यांत आले आहेत. प्लॅटफॉर्म तिकिटें देणाऱ्या यंत्राप्रमाणें "न्यूज व्हेंडॉर मशीन्स" या प्रदर्शनांत ठेवलीं असून हिंदुस्थानांतील एका बड्या वृत्तपत्र-चालकानें अशा २०० यंत्रांसाठीं ऑर्डर दिली आहे. चवली टाकतांच पत्राचा ताजा अंक या मशीनमधून ग्राहकांचे हातीं येईल.










अनुक्रमणिका

Regd. No. B. 5177

# आमचीं नवीं प्रकाशनें

## जिवंत व्रतोत्सव

( सुधारून वाढविलेली द्वितीयावृत्ति )

लेखक : आचार्य काकासाहेब कालेलकर

अनुवादक : भाऊ धर्माधिकारी

आपल्या लोकजीवनांत असणाऱ्या सणांचें आणि उत्सवांचें स्वरूप ओळखून लोकशिक्षक आचार्य काकासाहेब कालेलकर यांनीं या पुस्तकांत जुन्या उत्सव-सणांचें पुनरुज्जीवन नव्या काळाला अनुसरून केलें आहे. त्याचप्रमाणें अद्ययावत् अशा अगदीं नवीन उत्सव-सणांचीहि भर त्यांनीं त्यांत घातली आहे. विद्यार्थी आणि शिक्षक यांना अत्यंत उपयुक्त.

पृष्ठें २६० मूल्य ३॥ रुपये

## हिंदुधर्माचीं मूलतत्त्वें आणि पुनर्घटना

( सुधारलेली द्वितीयावृत्ति )

लेखक : डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन्

अनुवादक : बाळूभाई मेहता

भारताचे त्रिखंडकीर्ति पंडित डॉ. राधाकृष्णन् यांच्या ‘Hindu View of Life,’ या ग्रंथाचा सुबोध अनुवाद. युरोपीय श्रोतृवृंदापुढें दिलेल्या या चार व्याख्यानांमधून डॉ. राधाकृष्णन् यांनीं हिंदुधर्माच्या तत्त्वज्ञानाचें आविष्करण सोपपात्तिक रीतीनें केलें असून त्यामधील उणीवा भरून काढण्याचा योग्य मार्ग दाखविला आहे. युरोपीय विद्वानांत हा ग्रंथ अत्यंत मान्यता पावला असून हिंदुधर्माचें यथातथ्य स्वरूप समजावून घेण्याला यासारखें दुसरें साधन नाहीं.

पृष्ठें १४४ मूल्य २॥ रुपये

## प्रवासी

लेखक : महाकवि खलिल जिब्रान

अनुवादक : रघुनाथ गणेश जोशी

‘ जीवन-दर्शन ’ ( Prophet ) काराच्या लेखणींतून उतरलेलें हृदयंगम पुस्तक. या पुस्तकांत जीवन-सत्याच्या शोधार्थ अखिल विश्वांत परिभ्रमण करणाऱ्या प्रवाशानें सांगितलेल्या एकावन्न कथा ग्रथित करण्यांत आल्या आहेत. प्रवास-मार्गावरील धूलि आणि तितिक्षा यांनींच या कथांची गुंफण झाली असल्यामुळें वाचकांस त्या बहुमोल वाटतील, यांत शंका नाहीं.

पृष्ठें १२० मूल्य २ रुपये

## सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला, पुणें २